

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका

Registered No. B 577

॥ श्रीः ॥

# विविधज्ञानविस्तार

## मासिक पुस्तक.

पुस्तक ४१ दिसेंबर १९१०. अंक १२.

अनुक्रमणिका.



मुंबईत

नाडकर्णी आणि मंडळी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

वर्गणी—वर्षाची आगाऊ रु. ३; मागाहून रु. ४-०-०.

फुटकळ अंकाची किं. ६ आणे.

१८-१२-१०.



॥ श्री ॥

# विविधज्ञानविस्तार.

पुस्तक ४१. अंक १२.

## धर्मशिक्षण.

( हा निबंध वऱ्हाड-शिक्षकसमाजांत ता. २७ आक्टोबर सन १९१० रोजीं वाचिला. प्रस्तावना गाळिली आहे, व वाचीत असतां कांहीं मुद्यांचें विवरण ज्यास्त स्पष्ट केलें, तर वेळ नसल्यानें कांहीं अजीबाद गाळिलें.)

मनुष्य आणि पशु यांत भेद आहे तो विशेषें-करून धर्मानें आहे. "धर्मेण हीनाः पशुभिः समानाः," असें संस्कृत सुभाषित आहे. हा विशेष कायम राखणें जर जरूर आहे, तर धर्माचें शिक्षण लहानपणापासून मनुष्यास दिलें पाहिजे. शाळेंतील शिक्षणाचा प्रधान हेतु शील बनविणें हा आहे; व शील धर्मानें बनतें, ह्मणून धर्माचा शाळेंतील शिक्षणविषयांत समावेश केला पाहिजे.

धर्माचे अर्थ.

धर्माचे अर्थ अनेक आहेत. कांहीं व्यापक आहेत, कांहीं संकुचित आहेत. संस्कृत धर्मग्रंथांत 'आचारः प्रथमो धर्मः' अशी व्याख्या दिली आहे. तरी स्मृतीचे अध्याय आचार, व्यवहार व प्रायश्चित्त असे अ-सून, या सर्वांचा समावेश पुनः आचारांतच होतो.

इंग्रजी शब्द Religion and morality हे भिन्नार्थी आहेत, तेव्हां तद्वाचक मराठी शब्द भिन्नार्थी असले पाहिजेत अशा समजुतीनें आली-कडील मराठी ग्रंथांत, वर्तमानपत्रांत, व व्या-ख्यानांत "धर्म" व "नीति" यांची संकुचित अर्थीं योजना झाली आहे. परंतु इंग्रजी न जा-णणाऱ्या मनुष्याच्या लक्षांत हा भेद येत नाहीं. ते धर्मांतच नीतीचा समावेश करितात.

पाश्चात्य देशांत धर्माबद्दल रणें पडल्यानें धर्मावर दावा लावून नीतीला आपलें क्षेत्र कसें-बसें मर्यादित करून घ्यावें लागलें. तेव्हां तिकडे धर्मक्षेत्र निराळें व नीतिक्षेत्र निराळें झालें. धर्मांत ईश्वर व मनुष्य यांचे परस्पर संबंध एवढेच येतात. नीतींत मनुष्यामनुष्याचे संबंध येतात. पण ही फारकत गेल्या शतकांत तिकडे झाली ती अडचणीची झाली. क्षेत्राक्षेत्राच्या मर्यादा एकमेकांत संकीर्ण झाल्यानें स्पष्ट रेखा-टतां येतना. तशांत धर्माचें क्षेत्र अज्ञेयवादानें एकुणिसाव्या शतकाच्या द्वितीयार्धारंभीं फारच संकुचित केलें होतें, तें ईश्वरस्वरूपवाद्यांनीं त्या शतकाच्या अखेर अखेर पुनः वाढविलें; व आतां धर्मांतच नीतीचा अंतर्भाव होतो, किंवा कांहीं-च्या मतें नीतींतच धर्माचा अंतर्भाव होतो, असा समज तिकडे होत आहे.

तेव्हां या इतिहासास अनुसरून व मराठी सामान्य प्रयाग लक्षांत आणून मीं या व्याख्या-नांत धर्मांतच नीतीचा अंतर्भाव केला आहे. हा प्रकार सोईचा आहे. क्वचित् धर्म व नीति यांचा भेद दाखविणें अवश्य वाटेल तेथें त्या त्या संकुचित अर्थीं ते शब्द मी वापरीन.

धर्माचें शिक्षण शाळेंत असावें.

सरकारी शाळांत धर्मशिक्षण दिलें जात नाहीं, केवळ नीतिशिक्षण देतात, व तेंहीं गौण व प्रसंगोपात्त ह्मणून अव्यवस्थित रीतीनें देतात, तें फलद्रूप होत नाहीं, अशी पुष्कळांची तक्रार होती व आहे. राणीच्या जाहीरनाम्यांतील व-




अनुक्रमणिका

चन आहे कीं "आह्मी आपल्या प्रजाजनाच्या धर्मांत किंवा धर्मसमजुतींत हात घालणार नाहीं." त्या वचनास अनुसरून हिंदुस्थानांतील सरकारी शाळांत विशिष्ट धर्म शिकविण्याचा प्रतिबंध आहे. तरी सामान्य अथवा विश्वधर्म याचीं सामान्य तत्त्वें—ईश्वर सृष्टिकर्ता आहे, ईश्वर न्यायी व दयाळू आहे, त्याची शक्ति अपार आहे, त्याचा महिमा अगाध आहे, मनुष्यें हीं त्याचीं लेंकरें आहेत, त्यांवर त्याची समदृष्टि आहे, तो नियंता आहे—इ. इ. धड्यांत व कवींच्या उक्तींत गोविलीं आहेत, त्यांचें निरूपण कमीज्यास्त प्रमाणानें होतच असे (व असतें). मात्र बायबल, कुराण, किंवा भगवद्गीता यांतील वचनांवर व्याख्यान होत नसे (व नाहीं). ह्मणजे विशिष्ट धर्मांचीं विशिष्ट तत्त्वें सांगण्यांत येत नसत (व नाहींत).

नीतीच्या शिक्षणास मुळींच प्रत्यवाय नव्हता [व नाहीं]. प्रत्येक शिक्षकानें नीतीचे धडे समजून द्यावे, व मुलाच्या शाळेंतील व इतरत्र वर्तनावर देखरेख ठेवावी, असे हुकुम असत [व आहेत]; व ते शिक्षक यथाशक्ति यथामति पाळीत [व पाळितात] हीं. तरी नीतिशिक्षण हा परीक्षेचा विषय नसे, व नाहीं.

या अप्रत्यक्ष व प्रसंगोपात्त दिलेल्या शिक्षणाचीं फळें गोडच आलीं; असें मोठमोठ्या सरकारी अधिकाऱ्यांनीं—Sir Bartle Frere, Sir Michael Westropp यांनीं एकुणिसाव्या शतकाच्या द्वितीयार्धांत व Lord Curzon व Lord Morley यांनीं हें शतक संपल्यावर चालू शतकाच्या आरंभीं—ह्मटलें आहे. सरकारी कामकाजांत आलीकडे शिकलेल्या लोकांची नीतिमत्ता पूर्वींच्या पिढींतल्या लोकांपेक्षां विशेष आहे, अशा अर्थाचे त्यांचे अभिप्राय आहेत.इतर निस्पृह व शांत प्रेक्षकांचेही अभिप्राय असेच पडतात. माझाही अनुभव तसाच आहे.

तर हेंच शिक्षण मुख्य अंगांपैकीं एक ह्मणून व व्यवस्थित रीतीनें शाळेंत दिलें तर त्याचीं फळें याहून गोड येणार नाहींत काय? त्यांतही विशेष धर्मांचीं तत्त्वें पालकाच्या संमतीनें शाळेंत मुलांस समजावून दिलीं, तर जाहीरनाम्यांतील वचनास हरताळ लागणार नाहीं, अशा समजुतीनें धर्मशिक्षण शाळेंत सरकारानें द्यावें, असा पुष्कळांचा अभिप्राय पडला आहे. धर्मशिक्षण हें सरकारी शाळेंतील शिक्षकाचें काम नव्हे, हें त्या त्या धर्मांतील लोकांचें काम आहे, शाळा ही धर्मशिक्षणाची जागा नव्हे—तें मंदिर, मशीद किंवा मठ यांत त्या त्या पंथाच्या गुरूनें द्यावें, असें आजपर्यंत सरकाराचें ह्मणणें पडे. पुढें थोडीशी सवलत कांहीं कांहीं प्रांतांत सरकारानें दिली. ती ही कीं, शाळेंत शाळेच्या तासांच्या बाहेर लोकांनीं नेमिलेल्या गुरूनें धर्मशिक्षण द्यावें. पण या सवलतीचा उपयोग त्या प्रांतांतील लोकांनीं करून घेतला नाहीं. तेव्हां लोकांना यासंबंधानें आस्था नाहीं असें अनुमान काढण्याकडे कांहींची प्रवृत्ति आहे. पण तसें करणें चूक होईल. लोकांना एकमतानें कार्यास प्रारंभ करण्याचें अझून वळण लागलें नाहीं, एवढेंच अनुमान निघेल.

तेव्हां सरकारापाशीं कांहीं विचारवंत नायकांचें ह्मणणें आहे कीं, "लोकांना ज्या गोष्टी इष्ट दिसतात, त्या आपण पुढाकार घेऊन घडवून आणण्यास ते आज तयार नाहींत, हें सरकारच्या निदर्शनास आलेंच आहे. उदाहरणार्थ, पतपेढ्या स्थापन करण्याला व शेती सुधारण्याला लोक पाय मागें घेतात, असें सरकारास दिसून आलें तेव्हां सरकार आपण पुढाकार घेऊन लोकांस प्रांतोप्रांतीं जागें करीत आहे, व हळू हळू तीं कामें त्यांच्याच गळ्यांत



अनुक्रमणिका

घालूं पाहत आहे. तसाच पुढाकार धर्मशिक्षणार्थ सरकारानें कां घेऊं नये?" या गोष्टीचा खल सरकारांत चालू आहे. कांहीं अधिकारी अनुकूल आहेत; कांहींना अडचणींचा बाऊ वाटत आहे. पण अलीगड येथील मुसलमान कालेज, काशी येथील हिंदु सेंट्रल कालेज, मुंबई येथील गोकुळदास तेजपाळ हायस्कूल, आर्यसमाजाच्या व ब्रह्मसमाजाच्या शाळा, यांत धर्मशिक्षण अडचणी न येतां दिलें जात आहे हा प्रत्यक्ष अनुभव आहे. तेव्हां धर्मशिक्षणाविषयीं सरकारचें शेवटीं अनुकूलच मत पडेल अशी उमेद आहे.

**धर्मशिक्षण पूर्वपरंपरा राखण्यास अवश्य.**

विचारवंत नायकांचें ह्मणणें आहे असें वर ह्मटलें--तेव्हां हा विचार कोणता असा सहज प्रश्न निघेल. त्यास उत्तर हें कीं, कोणताही समाज पूर्वपरंपरागत संस्थांपासून सर्वथैव भ्रष्ट झाला तर तो अधोगतीस लागतो, ह्मणून इतर संस्थांप्रमाणें त्याचा पूर्वपरंपरागत धर्मही लुप्त होतां कामा नये; व धर्माचा लोप न व्हावा अशी जर आवश्यकता आहे, तर मनुष्याच्या पूर्ववयांतच–अर्थात् शाळेंत किंवा घरीं, किंवा शाळेंत व घरीं–त्या धर्माचीं तत्त्वें बालकाच्या मनावर बिंबविलीं पाहिजेत. हें काम शाळेंतील गुरूनें पालकावर किंवा पालकानें शाळेंतील गुरूवर सर्वथैव लोटावें असें नाहीं. धर्मशिक्षणांत पालकाचें मुख्य अंग–निदान अनुकूलता तरी–पाहिजे, हें खरें. पण शाळेंतील गुरूनें हें काम अंगाबाहेर टाकावें, असें नाहीं. कारण, शाळेंत जर धर्माविषयीं अनास्था उत्पन्न झाली, तर वृद्धपणीं मनुष्याचें–अर्थात् समाजाचें–अहित होणार; व समाजाला कीड लागणार.

पूर्वपरंपरागत धर्माचा लोप होतां कामा नये याचा अर्थ हा नव्हे कीं, तो चालत आला तसाच—त्यांत कांहीं सुधारणा न होतां—चालावा. हें इष्ट नाहीं व शक्यही नाहीं. जशा इतर संस्था कालाकालानें परिस्थित्यनुरूप बदल पावतात, तसा धर्मही बदल पावतो व पावेल. समाजाची एक संस्था–धर्मसंस्था घ्या, दुसरी कोणतीही घ्या, ती–उच्छेदून तिच्या जागीं दुसरी कोरी करकरीत संस्था स्थापावी, ही कल्पना वेड्या पिरांच्या डोक्यांतच निघते, व ती अमलांत आणण्याचे प्रयत्न अनर्थावह झाले आहेत अशी अबाधित साक्ष इतिहास देतो. मागील इतिहासाकडेही धांव घेणें नको. हिंदुस्थानांतच चार पांच वर्षांतील अनिष्ट प्रकार डोळ्यांपुढें घडले ते ध्यानांत आणिले ह्मणजे पुरे आहे.

हा विचारवंताचा विचार जर मानवला तर धर्मशिक्षण शाळेंत द्यावें असें ठरलें. गृहीं पालकांनीं ही त्यास हातभार लावावा हेंही सिद्ध झालें. तसेंच गुरूनें व पालकांनीं होतां होईल तों धर्मशिक्षणाच्या कामीं एकमतानें चालावें, हेंही सिद्ध झालें. हे सिद्धांत कबूल केले तर पुढील बहुतेक सूचना ओघानेंच ग्राह्य होतील.

**शाळेंत धर्मशिक्षण कसें द्यावें?-साधनें.**

पहिलें साधन,—धर्मशिक्षण देणारा गुरु आचारवंत व धर्मनिष्ठ असला पाहिजे हें तर उघडच आहे. तो ज्या विशिष्ट धर्माचीं तत्त्वें फोडून सांगेल, तीं त्याला अवगत झालीं पाहिजेत. त्याचें ज्ञान चांगलें पाहिजे, अनुभवही पाहिजे. पण सर्वांत विशेष गोष्ट ही कीं, तो आचारप्रयत पाहिजे. त्याच्या घरांतील व बाहेरच्या व शाळेंतील वर्तनाविरुद्ध कोणीं ब्र काढितां कामा नये. या कामांत संशयाचें वारेंही घातक आहे. याच्या खालचे पण बहुतेक तितकेच आवश्यक गुण त्याच्या अंगीं असले पाहिजेत ते हे;–उत्साह, समाधान, जागरूकता, व आपल्या कर्तव्यासंबंधें निष्कामता. हे सारे गुण एकाच्याच अंगीं सांपडणें




अनुक्रमणिका

कठीण. पण हे ज्याच्या अंगीं दिसून येतील, त्याचा संग्रह करणें—त्याचा बहुमान करणें—त्याची दक्षिणा वाढविणें—हें सरकाराचें काम आहे; व त्या संबंधानें तें आतां जागें होत चाललें आहे हें प्रांताप्रांताच्या हकीकतीवरून दिसून येईल. जागृति ही संस्पर्शजन्य आहे, तेव्हां आज नाहीं उद्यां, इतरत्र जागृति झाली तशी ती आपल्या प्रांतांतही होईल, अशी आशा आहे.

साधन दुसरें,—शिष्यांशीं गुरूचें वर्तन. या संबंधानें दोन वर्षांपूर्वी या समाजांत मीं निबंध वाचिला होता, ह्मणून त्याची पुनरुक्ति करीत नाहीं. गुरूचें शिष्याच्या परमहिताशीं तादात्म्य झालें पाहिजे—ह्मणजे एका अंगानें प्रेम, दुसऱ्या अंगानें भक्ति हीं मिळून त्यांचा ओघ हृदयंगम होईल हें कधींही विसरतां कामा नये.

असे सर्वगुणसंपन्न गुरु विरलच असणार. एका शाळेंतील सर्वच शिक्षक असे असतील, ही भ्रांतिच. तेव्हां निदान दोन, नाहीं तर किमान पक्षीं एक तरी असा शिक्षक प्रत्येक शाळेंत असावा, व तो मुख्य स्थानीं असावा, अशी अपेक्षा करणें जरूर आहे, व ती सफल करणें सरकारच्या आटोक्याबाहेर आहे असें मला वाटत नाहीं. मात्र या कामीं दक्षता पाहिजे.

मुख्य गुरूच धर्मगुरु कां असावा?

जेव्हां शाळेंतील मुख्य गुरूच धर्मगुरु असेल, तेव्हां तो धर्मशिक्षणाकडे विशेष लक्ष देईल. तो शाळेस धर्मक्षेत्र बनवील. शाळेचें भौतिक वातावरण जसें शुद्ध हवें असतें, तसेंच—नव्हे त्याहूनही ज्यास्त अवश्य—शाळेचें आध्यात्मिक वातावरण हवें आहे. अशाच धर्मक्षेत्रांत व शुद्ध वातावरणाच्या संस्कारानें मुलांच्या मनांत स्वदेशाविषयीं योग्य अभिमान, कर्तव्यदीक्षा, स्वावलंबन, परधर्मसहिष्णुता, बंधु-इत्यादि उच्च मनोवृत्तींचें बीज रुजून त्यांस कालेंकरून मधुर फळें येतील. व त्या शाळेविषयीं लोकांच्या मनांत आदर उत्पन्न होईल. असाच धर्मगुरु आपल्या हाताखालील शिक्षकवर्गास धर्मशिक्षणाचें वळण लावील; ज्यानें त्यानें आपआपल्या वर्गांत त्या त्या वर्गाच्या अधिकारानुरूप शिक्षण द्यावें असें ठरवील. तसें न केल्यास धर्माचें शिक्षण प्रसंगोपात्त हल्लीं जें देण्यांत येत आहे त्यास फांटा मिळून तितकी हानि होईल; व वर्गशिक्षक धर्मशिक्षक नव्हे—तर अधर्मशिक्षक कीं काय?—अशी कुशंका विद्यार्थ्यांच्या मनांत येऊन, त्याजविषयींचा आदर कमी होईल. तो कमी होणें अगदीं इष्ट नाहीं.

धर्मशिक्षण कोठें सुरू करावें?

धर्मशिक्षण जर बाल्यावस्थेपासून देणें इष्ट आहे, तर तें प्राथमिक शाळेंतच सुरू करावें, असा सहज सिद्धांत निघेल. पण तसें करण्याला तूर्त पुष्कळ अडचणी आहेत. वर सांगितले असे गुणसंपन्न धर्मगुरु प्राथमिक शाळांतून तूर्त मिळणें असंभवनीय. व धर्मशिक्षणाचा प्रयोग प्रथमच शाळांतून करावयाचा, तेव्हां जेथें तो यशस्कर होण्याचा विशेष संभव तेथें करून पाहावा,—ह्मणजे हायस्कूलांतून व निवडक अं.—व्ह. शाळांतून करून पाहावा, असें माझें मत आहे. परंतु माझ्या कित्येक अनुभविक शिक्षकांचें व शाळातपासणारांचें मत असें आहे कीं, प्राथमिकच ह्मणजे खेड्यांच्याच शाळांतून हें शिक्षण प्रथम सुरू करावें; व ज्या अर्थी धर्माचे प्रथम पाठ केवळ आचाररूप—ह्मणजे वंदन—पठन—प्रदक्षिणा—पूजा अर्चा इ. असतात,—त्या अर्थी तेथें सुरू करण्यास बाध नाहीं. त्यांत खेड्यांतील लोक प्रायः एकमताचे, एक जातीचे, पुराणधर्माभिमानी असतात, तेव्हां त्यांची अनुकूलता संपादणें अगदीं सोपें जाईल. शहरांतील वस्ती बकाली, तेथील लोकांचे नाना पंथ, नाना मतें. गुरूविषयीं प्रायः




अनुक्रमणिका

अनादर, तेव्हां तेथें प्रयोग प्रथम सुरू करणें संशयास्पद होईल. यावर उत्तर हें–धर्माचे, प्रथम पाठ कोठेंही सुरू करण्यास हरकत नाहीं; पण धर्माच्या तत्त्वांचें प्रतिपादन करण्याइतका अधिकार वरच्याच शाळांतील शिक्षकांत आढळून येण्याचा संभव फार. अर्थात् हा विषय व्यक्तीच्या अधिकारावर अवलंबून आहे. तेव्हां जेथें त्या अधिकाराचीं माणसें मिळतील तेथें धर्मशिक्षण देण्यास हरकत करूं नये. कांहीं जिल्ह्यांत प्राथमिक शाळेंत सुरुवात होईल, तर इतरत्र वरच्या शाळांत होईल. दोन्ही प्रकारचा अनुभव इष्टच आहे. प्रयोग पाहण्याला सर्वच शाळांतून धर्मशिक्षण सुरू करणें जरूर नाहीं. जेथें जेथें गुरु वरच्या कसास कमीज्यास्त प्रमाणानें उतरतील, तेथें तेथें धर्मशिक्षण प्रथम सुरू करावें. गुरूंची निवड करण्यांत चूक होईल तर जे गुरु आपण होऊन धर्मशिक्षण देण्यास पुढें येतील त्यांस ही सवलत द्यावी.

धर्मशिक्षण सक्तीचें कीं ऐच्छिक असावें ?

प्रयोगास यश यावें अशी जर आपली इच्छा आहे, तर हें धर्मशिक्षण मुलांच्या इच्छेवर ह्मणजे खुषीवर असूं नये, तें सक्तीचें असावें. ह्मणजे धर्मशिक्षणार्थ जो वेळ नेमून दिला असेल त्या वेळीं प्रत्येक मुलानें वर्गांत बसलेंच पाहिजे असा नियम असावा. आपल्या प्रांतांत हिंदु व मुसलमान यांचाच काय तो विशेष भरणा, व त्यांच्या शाळा अव्वलपासून अखेरपर्यंत निरनिराळ्या झाल्या आहेत. या व्यवस्थेपासून एकंदरींत लाभ आहे कीं काय, हा प्रश्न तूर्त अप्रासंगिक आहे. पण ती व्यवस्था धर्मशिक्षणास सोईची झाली आहे. ह्मणजे मराठी शाळेंत हिंदुधर्म शिकविण्याची सोय केली, व हिंदुस्थानी शाळेंत मुसलमानी धर्म शिकविण्याची सोय केली ह्मणजे झालें. क्वचित् मराठी शाळेंत मुसलमान मुलें, क्वचित् हिंदुस्थानी शाळेंत हिंदु मुलें आढळतात. पण त्यांची संख्या फार थोडी. तेव्हां त्यांच्याबद्दल विशेष विचार करणें नको. हिंदू धर्माच्या विवेचनप्रसंगीं मुसलमान मुलांनी वर्गांत बसूं नये व हिंदूंनीं कुराणाच्या पाठाच्या वेळीं बसूं नये, एवढा निर्बंध केला ह्मणजे पुरे. असाच निर्बंध क्वचित् पारशी, नेटिव्ह क्रिश्चन वगैरेच्याकरितां जरूर आहे.

शिक्षण मुलांच्या खुषीवर असूं नये, सक्तीचें असावें, असें वर ह्मटलें. पण अशा प्रसंगीं पालकांची प्रतिकूलता असेल, ह्मणजे पालक लेखी अर्जानें ह्मणेल कीं माझ्या मुलास धर्मशिक्षण देऊं नये, तर तेथें मुलास संकुचितार्थी धर्माच्या शिक्षणासंबंधीं सवलत द्यावी, नीतीच्या शिक्षणांत सवलत देऊं नये. पालकांनीं जेथें लेखी निषेध कळविला नाहीं, तेथें त्यांची संमति आहे असें गृहीत धरून चालावें.

धर्मशिक्षणास निदान अर्धा तास नेमावा.

धर्मशिक्षण स्वतंत्र विषय झाला, तेव्हां त्याकरितां निदान अर्धा तास नेमावा असें माझें मत आहे. यांत प्रथम एखादें ईशस्तुतिपर अथवा प्रार्थनात्मक गीत गाऊन मग विशिष्ट धर्माचें तत्त्व निरूपावें. योग्य ग्रंथ निर्माण होत तोंपर्यंत साधुसंतांचीं वचनें ग्रथित करून त्यांचें निरूपण करावें. हीं वचनें जितकीं लहान असतील तितकीं बरीं. सूत्रात्मक असलीं ह्मणजे तीं स्मृतिपटलावर लौकर उमटून, ज्यास्त काळपर्यंत—नव्हे आमरणान्त–टिकतात. एकंदर तत्त्वें किती सांगावयाचीं, याची व्यवस्थित वर्गवारी (Syllabus) केल्यास सोय होईल–गोंधळ होणार नाहीं. कांहीं असे श्लोक "प्राणाघातान्निवृत्तिः" "अभयं सत्त्वसंशुद्धिः" इत्यादि जगत्प्रसिद्ध आहेत, व त्यांवर वामनाच्या अगर ज्ञानदेवाच्या





अनुक्रमणिका

कठीण. पण हे ज्याच्या अंगीं दिसून येतील, त्याचा संग्रह करणें—त्याचा बहुमान करणें—त्याची दक्षिणा वाढविणें—हें सरकारचें काम आहे; व त्या संबंधानें तें आतां जागें होत चाललें आहे हें प्रांताप्रांताच्या हकीकतीवरून दिसून येईल. जागृति ही संस्पर्शजन्य आहे, तेव्हां आज नाहीं उद्यां, इतरत्र जागृति झाली तशी ती आपल्या प्रांतांतही होईल, अशी आशा आहे.

साधन दुसरें,—शिष्यांशीं गुरूचें वर्तन. या संबंधानें दोन वर्षांपूर्वी या समाजांत मीं निबंध वाचिला होता, ह्मणून त्याची पुनरुक्ति करीत नाहीं. गुरूचें शिष्याच्या परमहिताशीं तादात्म्य झालें पाहिजे—ह्मणजे एका अंगानें प्रेम, दुसऱ्या अंगानें भक्ति हीं मिळून त्यांचा ओघ हृदयंगम होईल हें कधींही विसरतां कामा नये.

असे सर्वगुणसंपन्न गुरु विरलच असणार. एका शाळेंतील सर्वच शिक्षक असे असतील, ही भ्रांतिच. तेव्हां निदान दोन, नाहीं तर किमान पक्षीं एक तरी असा शिक्षक प्रत्येक शाळेंत असावा, व तो मुख्य स्थानीं असावा, अशी अपेक्षा करणें जरूर आहे, व ती सफल करणें सरकारच्या आटोक्याबाहेर आहे असें मला वाटत नाहीं. मात्र या कामीं दक्षता पाहिजे.

मुख्य गुरूच धर्मगुरु कां असावा?

जेव्हां शाळेंतील मुख्य गुरूच धर्मगुरु असेल, तेव्हां तो धर्मशिक्षणाकडे विशेष लक्ष देईल. तो शाळेस धर्मक्षेत्र बनवील. शाळेचें भौतिक वातावरण जसें शुद्ध हवें असतें, तसेंच—नव्हे त्याहूनही ज्यास्त अवश्य—शाळेचें आध्यात्मिक वातावरण हवें आहे. अशाच धर्मक्षेत्रांत व शुद्ध वातावरणाच्या संस्कारानें मुलांच्या मनांत स्वदेशाविषयीं योग्य अभिमान, कर्तव्यदीक्षा, स्वावलंबन, परधर्मसहिष्णुता, बंधुप्रेम, इत्यादि उच्च मनोवृत्तींचें बीज रुजून त्यांस कालेंकरून मधुर फळें येतील. व त्यः शाळेविषयीं लोकांच्या मनांत आदर उत्पन्न होईल. असाच धर्मगुरु आपल्या हाताखालील शिक्षकवर्गास धर्मशिक्षणाचें वळण लावील; ज्यानें त्यानें आपआपल्या वर्गांत त्या त्या वर्गाच्या अधिकारानुरूप शिक्षण द्यावें असें ठरवील. तसें न केल्यास धर्माचें शिक्षण प्रसंगोपात्त हल्लीं जें देण्यांत येत आहे त्यास फांटा मिळून तितकी हानि होईल; व वर्गशिक्षक धर्मशिक्षक नव्हे—तर अधर्मशिक्षक कीं काय ?—अशी कुशंका विद्यार्थ्यांच्या मनांत येऊन, त्याजविषयींचा आदर कमी होईल. तो कमी होणें अगदीं इष्ट नाहीं.

धर्मशिक्षण कोठें सुरू करावें?

धर्मशिक्षण जर बाल्यावस्थेपासून देणें इष्ट आहे, तर तें प्राथमिक शाळेंतच सुरू करावें, असा सहज सिद्धांत निघेल. पण तसें करण्याला तूर्त पुष्कळ अडचणी आहेत. वर सांगितले असे गुणसंपन्न धर्मगुरु प्राथमिक शाळांतून तूर्त मिळणें असंभवनीय. व धर्मशिक्षणाचा प्रयोग प्रथमच शाळांतून करावयाचा, तेव्हां जेथें तो यशस्कर होण्याचा विशेष संभव तेथें करून पाहावा,—ह्मणजे हायस्कूलांतून व निवडक अं.—व्ह. शाळांतून करून पाहावा, असें माझें मत आहे. परंतु माझ्या कित्येक अनुभविक शिक्षकांचें व शाळातपासणारांचें मत असें आहे कीं, प्राथमिकच ह्मणजे खेड्यांच्याच शाळांतून हें शिक्षण प्रथम सुरू करावें; व ज्या अर्थीं धर्माचे प्रथम पाठ केवळ आचाररूप—ह्मणजे वंदन—पठन—प्रदक्षिणा—पूजा अर्चा इ. असतात,—त्या अर्थीं तेथें सुरू करण्यास बाध नाहीं. त्यांत खेड्यांतील लोक प्रायः एकमताचे, एक जातीचे, पुराणधर्माभिमानी असतात, तेव्हां त्यांची अनुकूलता संपादणें अगदीं सोपें जाईल. शहरांतील वस्ती बकाली, तेथील लोकांचे नाना पंथ, नाना मतें. गुरुविषयीं प्रायः



अनुक्रमणिका

अनादर, तेव्हां तेथें प्रयोग प्रथम सुरू करणें संशयास्पद होईल. यावर उत्तर हें–धर्माचे, प्रथम पाठ कोठेंही सुरू करण्यास हरकत नाहीं. पण धर्माच्या तत्त्वांचें प्रतिपादन करण्याइतका अधिकार वरच्याच शाळांतील शिक्षकांत आढळून येण्याचा संभव फार. अर्थात् हा विषय व्यक्तीच्या अधिकारावर अवलंबून आहे. तेव्हां जेथें त्या अधिकाराचीं माणसें मिळतील तेथें धर्मशिक्षण देण्यास हरकत करूं नये. कांहीं जिल्ह्यांत प्राथमिक शाळेंत सुरुवात होईल, तर इतरत्र वरच्या शाळांत होईल. दोन्ही प्रकारचा अनुभव इष्टच आहे. प्रयोग पाहण्याला सर्वच शाळांतून धर्मशिक्षण सुरू करणें जरूर नाहीं. जेथें जेथें गुरु वरच्या कसास कमीज्यास्त प्रमाणानें उतरतील, तेथें तेथें धर्मशिक्षण प्रथम सुरू करावें. गुरूंची निवड करण्यांत चूक होईल तर जे गुरु आपण होऊन धर्मशिक्षण देण्यास पुढें येतील त्यांस ही सवलत द्यावी.

धर्मशिक्षण सक्तीचें कीं ऐच्छिक असावें ?

प्रयोगास यश यावें अशी जर आपली इच्छा आहे, तर हें धर्मशिक्षण मुलांच्या इच्छेवर ह्मणजे खुषीवर असूं नये, तें सक्तीचें असावें. ह्मणजे धर्मशिक्षणार्थ जो वेळ नेमून दिला असेल त्या वेळीं प्रत्येक मुलानें वर्गांत बसलेंच पाहिजे असा नियम असावा. आपल्या प्रांतांत हिंदु व मुसलमान यांचाच काय तो विशेष भरणा, व त्यांच्या शाळा अव्वलपासून अखेरपर्यंत निरनिराळ्या झाल्या आहेत. या व्यवस्थेपासून एकंदरींत लाभ आहे कीं काय, हा प्रश्न तूर्त अप्रासंगिक आहे. पण ती व्यवस्था धर्मशिक्षणास सोईची झाली आहे. ह्मणजे मराठी शाळेंत हिंदुधर्म शिकविण्याची सोय केली, व हिंदुस्थानी शाळेंत मुसलमानी धर्म शिकविण्याची सोय केली ह्मणजे झालें. क्वचित् मराठी शाळेंत मुसलमान मुलें, क्वचित् हिंदुस्थानी शाळेंत हिंदु मुलें आढळतात. पण त्यांची संख्या फार थोडी. तेव्हां त्यांच्याबद्दल विशेष विचार करणें नको. हिंदू धर्माच्या विवेचनप्रसंगीं मुसलमान मुलांनीं वर्गांत बसूं नये व हिंदूंनीं कुराणाच्या पाठाच्या वेळीं बसूं नये, एवढा निर्बंध केला ह्मणजे पुरे. असाच निर्बंध क्वचित् पारशी, नेटिव्ह क्रिश्चन वगैरेच्याकरितां जरूर आहे.

शिक्षण मुलांच्या खुषीवर असूं नये, सक्तीचें असावें, असें वर ह्मटलें. पण अशा प्रसंगीं पालकांची प्रतिकूलता असेल, ह्मणजे पालक लेखी अर्जानें ह्मणेल कीं माझ्या मुलास धर्मशिक्षण देऊं नये, तर तेथें मुलास संकुचितार्थी धर्माच्या शिक्षणासंबंधीं सवलत द्यावी, नीतीच्या शिक्षणांत सवलत देऊं नये. पालकांनीं जेथें लेखी निषेध कळविला नाहीं, तेथें त्यांची संमति आहे असें गृहीत धरून चालावें.

धर्मशिक्षणास निदान अर्धा तास नेमावा.

धर्मशिक्षण स्वतंत्र विषय झाला, तेव्हां त्याकरितां निदान अर्धा तास नेमावा असें माझें मत आहे. यांत प्रथम एखादें ईशस्तुतिपर अथवा प्रार्थनात्मक गीत गाऊन मग विशिष्ट धर्माचें तत्त्व निरूपावें. योग्य ग्रंथ निर्माण होत तोंपर्यंत साधुसंतांचीं वचनें ग्रथित करून त्यांचें निरूपण करावें. हीं वचनें जितकीं लहान असतील तितकीं बरीं. सूत्रात्मक असलीं ह्मणजे तीं स्मृतिपटलावर लौकर उमटून, ज्यास्त काळपर्यंत—नव्हे आमरणान्त—टिकतात. एकंदर तत्त्वें किती सांगावयाचीं, याची व्यवस्थित वर्गवारी (Syllabus) केल्यास सोय होईल–गोंधळ होणार नाहीं. कांहीं असे श्लोक "प्राणाघातान्निवृत्तिः" "अभयं सत्त्वसंशुद्धिः" इत्यादि जगत्प्रसिद्ध आहेत, व त्यांवर वामनाच्या अगर ज्ञानदेवाच्या






अनुक्रमणिका

टीका प्रसिद्ध आहेत. तुकाराम, नामदेव, एकनाथ, रंगनाथ यांचे निवडक अभंग व पदेंही घेतां येतील.

निरूपणवैचित्र्याकरितां व पूर्वपरंपरा कायम राखण्याकरितां रामायण, महाभारत, मनुस्मृति यांतीलही निवडक वेंचे घेतां येतील. या सर्व ग्रंथांचीं आतां मराठींत भाषांतरें झालीं आहेत. उपनिषदें, भगवद्गीता हीं कदाचित् आपल्या शाळांत दुर्बोध होतील. परंतु कांहीं वेंच्यांचीं भाषांतरें—उदाहरणार्थ "मातृदेवो भव" इ.—तीन तीन झालीं आहेत! इतकीं तीं लोकांत प्रिय आहेत! "मातृदेवो भव" या सूत्राचा उच्चार होतांच एका गोष्टीची आठवण झाली, ती सांगणें अप्रासंगिक होणार नाहीं. आपले परमपूज्य माजी बादशहा सातवे एडवर्ड-ज्यांच्या अकाली निधनाची वार्ता ऐकून प्रजा शोकग्रस्त झाली, त्यांची—एक रीति M. Xavier Paolie यांनीं नुक्तीच वर्णिली आहे. हे गृहस्थ फ्रान्स देशांत जेव्हां सातवे एडवर्ड महाराज येत, तेव्हां त्यांची व्यवस्था ठेवण्याचें काम फ्रेंच सरकाराच्या आज्ञेवरून करीत. ते ह्मणतात, "मला असें आढळून आलें कीं, एडवर्ड महाराजांच्या लिहिण्याच्या टेबलावर हरएक प्रसंगीं प्रवासांत परमपूज्य महाराणी व्हिक्टोरिया यांचा मोठा फोटो ठेविला असे. इतकी त्यांची मातृभक्ति!" तिचें दर्शन, तिचें स्मरण केल्यावांचून महाराज कांहीं काम करीत नसत. Queen Alexandra चें वत्सलपत्र व George V चे उद्गार "Edward VII was my father and guide" हीं ही "मातृदेवो भव" "पितृदेवो भव" या उपदेशाच्या पूर्ण ठशाची साक्ष देतात. येथें इतकीच इशारत दिली पाहिजे कीं, "देव" पदवी प्राप्त होण्यास मातेस व पित्यास तसेंच योग्य शिक्षण मिळालें असलें पाहिजे.

असो. थोडें विषयांतर प्रसंगानें झालें त्याची क्षमा होईल. निवडक अभंग व निवडक पदें असें ह्मटलें याचें कारण हें कीं, हिंदु धर्माचीं सामान्य तत्त्वें ज्यांत ग्रथित केलीं आहेत, विशिष्ट पंथांचीं केलीं नाहींत, अशींच घेतलीं पाहिजेत. महाराष्ट्राच्या भाग्यानें शैव वैष्णव यांचें भांडण भागवत धर्मांत मिटलें आहे. दत्तसंप्रदाय, रामदाससंप्रदाय, व विठ्ठलसंप्रदाय हे प्रायः भागवत धर्मांतच अंतर्भूत होतात. या भागवत धर्माचें शुद्ध व उज्ज्वल रूप कै. न्या. रानडे, कै. मोडक, व डा. भांडारकर यांच्या व्याख्यानांत निरूपिलें आहे. हे ग्रंथ आपण अवश्यमेव वाचावे. हे तिघेही प्रार्थनासमाजाचे सभासद होते अथवा आहेत; व त्या समाजाच्या विशिष्ट मतांबद्दल त्यांचा तीव्र अभिमान—हट्ट ह्मणा,—क्वचित् क्वचित् दिसतो. परंतु एकंदरींत परमतसहिष्णुताच ज्यास्त आहे. त्याच समाजाचें प्रार्थनासंगीतही आक्षेप न घेण्याजोगें आहे. "राम," "विठ्ठल," हीं पदें काढून "ईश," "ईश्वर" हीं पदें याच हेतूनें घातलीं आहेत. परंतु मला वाटतें "हरि" ठेविला तर "राम" राहण्यासही बाध नव्हता. पण ही माझी कोती समजूत!

(पुढील वाक्यसमूहांत धर्म संकुचित अर्थीं योजिला आहे.)

**हिंदू धर्माचीं ठोकळ तत्त्वें**

कोणत्याही पंथाचा हिंदू असो, तो परमेश्वर दयाळू, महापराक्रमी आहे असें मानितो. तो जग चालवितो, सूर्य चंद्र त्याच्या आज्ञेनें वर्ततात, वायु त्याला भितो; तो सर्वांतर्यामी असून विश्वापलीकडे आहे, त्यानें जग निर्माण केलें,—नाना जीवयोनि निर्मिल्या—त्यांत मनुष्ययोनि त्याला ज्यास्त प्रिय. कारण, पुरुष हाच "ब्रह्मावलोकधिषण" होय. ह्मणजे यालाच ईश्वरप्राप्ति घडेल. मनुष्याचा देह जड, जीव हा परमात्म्याची ज्योति. जीव व परमात्मा यांचें ऐक्य





अनुक्रमणिका

होणें हीच मुक्ति. ती शुद्ध आचारानें, विचारानें, सत्संगानें व निष्काम भक्तीनें होईल. ईश्वराच्या पूजेचे प्रकार यथामति सांगितले आहेत. मूर्तिपूजा अधम आहे, पण पूजासोपानाची एक पायरी आहे. याच जन्मांत सोक्षमोक्ष होत नाहीं. पुनर्जन्माची सोय घालून देऊन पश्चात्ताप व आशा यांस अवकाश ठेविला आहे. प्रत्येक जण संचितानुरूप सुखदुःख भोगितो. ईश्वर समदृष्टि व परम कारुणिक आहे. ज्यानें त्यानें आपल्या मतानें श्रेय साधावें. इहलोकीं अधर्म वाढला ह्मणजे ईश्वर साधूंच्या संरक्षणाकरितां व दुष्टांचा संहार करण्याकरितां अवतार घेतो. ही अवतारकल्पना विस्तृत अर्थीं वा संकुचित अर्थीं सर्व धर्मांस संमत आहे. भेद–एक अवतार घेणें कीं पुष्कळ अवतार घेणें–प्रत्यक्ष रूप घेणें कीं साधुसंतांच्या हृदयांत स्फूर्ति उत्पन्न करणें–यांत आहे. हिंदु धर्माचें सर्वांत मोहक तत्त्व, माझ्या मतें, परधर्मसहिष्णुता हें होय. दुसऱ्या धर्माच्या लोकांचा छळ करूं नका, आपआपल्या धर्मांत जो राहील त्यास श्रेय मिळेल. केवढें हें उदार तत्त्व! जातिधर्म हें सामान्य हिंदु धर्माचें तत्त्व नव्हे–वर्णाश्रमधर्माचें तत्त्व आहे. त्यासंबंधानें येथें मी बोलूं शकत नाहीं. कारण यासंबंधानें मतभेद फार आहे. तरी "जनीं जनार्दन" अशी दृष्टि अत्युच्च पदवीचें लक्षण होय. व भागवतांत अक्रा पूजाप्रकारांत "वैष्णवपूजा" ही अत्यंत श्रेष्ठ ह्मटली आहे, व एकनाथस्वामी ह्मणतात अत्यंत कठीण आहे. भागवतांत वैष्णव याचा अर्थ विष्णुभक्त–ईशभक्त–असा आहे. भक्तीचा अंकुर ज्या अर्थीं प्रत्येक मनुष्याच्या हृदयांत आहे, व त्याची वाढ होण्यास योग्य परिस्थिति व योग्य शिक्षण मात्र पाहिजे, असा माझा विश्वास आहे, त्या अर्थीं वैष्णव याचा अर्थ मनुष्यमात्र व "वैष्णवपूजा" ह्मणजे "मानवजातिपूजा" असा होऊं शकतो. हा भाग जेव्हां मीं वाचिला, तेव्हां मला कॉम्प्ट या फ्रेंच विद्वानाच्या "मानवजातिधर्माची" आठवण झाली! अठराव्या शतकांतील पाश्चात्यांचे अत्यंत उदात्त विचार प्राच्य आर्यग्रंथांत ग्रथित आहेत, याबद्दल आपणास अभिमान वाटणें साहजिक आहे. पण त्याबरोबरच जेव्हां आह्मी आपलें वर्तन पडताळून पाहतों, तेव्हां ते विचार व आमचें नीच निंद्य आचरण यांतील अंतर लक्षांत येऊन आह्मांस मान खालीं घालावी लागते. तें अंतर कमी करणें, प्राचीन उच्च पदवीवर लक्ष ठेवून आपला मार्ग काढणें, हाच धर्मशिक्षणाचा उद्देश होय. तो प्रयत्नांतीं व ईश्वरी कृपेनेंच सफल होणार.

हिंदू धर्मशिक्षणास मिशनरी आक्षेप घेणार नाहींत.

आमचा भागवत धर्म, दक्षिण हिंदुस्थानांतील विशिष्टाद्वैत पंथ, उत्तरहिंदुस्थानांतील तुळशीदासकृत रामायणप्रतिपादित रामभक्तिधर्म, व पंजाबांतील सीख धर्म अथवा पंथ, यांचा व शंकराचार्यप्रतिपादित वेदांताचा गौरव पाश्चात्य विद्वानांनीं केला आहे. कांहीं महिन्यांपूर्वीं डा. ग्रीयरसन यांनीं शंकरप्रतिपादित वेदान्त खेरीज करून इतर पंथ सर्व ख्रिस्ती लोकांच्या आदरास पात्र होतील असें ह्मटलें आहे. व त्याचें प्रत्यंतर थोडक्या दिवसांमागें केंब्रिज येथें भरलेल्या Church Congress मध्यें भाषणें झालीं त्यांत दिसून आलें. तेव्हां आपल्या इकडील सरकारी शाळांतील धर्मशिक्षणास मिशनरी लोकांकडून सरकाराकडे आक्षेप घेण्यांत येतील असें वाटत नाहीं.

शिक्षकांचे आक्षेप.

धर्मशिक्षण हा नवा विषय घातला, तेव्हां याला निराळा अर्धा तास ठेवणार, ह्मणजे शाळेच्या शिक्षणाचे तास वाढविणार, किंवा दुसऱ्या वि-



षयांस दिलेल्या वेळांत छाटाछाट करून हा तास काढणार,—कसें झालें तरीं मुलांवरच शिक्षणाचा बोजा वाढणार, हें इष्ट नाहीं; कारण, नुकतेच दोन विषय—शास्त्र व चित्रकला—नवीन घातल्यानें, व इतिहास व भूगोल हे स्वतंत्र स्वतंत्र विषय केल्यानें, मुलांवर आधींच बोजा ज्यास्त झाला आहे, तेव्हां तो वाढविणें बरोबर नाहीं, असा आक्षेप कित्येक शाळांतील शिक्षक घेतील, व घेत आहेत, हें मी जाणून आहें. परंतु नवीन सुसंस्कृत पद्धतीनें हे सारे विषय शिकवावयाचे आहेत, तेव्हां स्मृतीवरचें दडपण कमी होईल. नवीन विषयांचें स्मृतीवर मुळींच दडपण पडणार नाहीं, ही माझी खात्री आहे. अर्थात् सुसंस्कृत पद्धति सर्वत्र प्रचलित होऊन व्यवस्थित रीतीनें शिकविली जाण्यास कालावधि लागणारच आहे. परंतु धर्मासंबंधी आक्षेपास माझें उत्तर एवढेंच आहे कीं, या विषयांत लेखी किंवा तोंडी परीक्षा घ्यावयाचीच नाहीं. धर्मविषय मुलाच्या मनांत बिंबला कीं नाहीं याची परीक्षा त्याच्या वर्तनांत दिसून येईल. व उत्तम धर्मनिष्ठ मुलगा कोणता हें गुरूच नव्हत तर त्या त्या वर्गांतील मुलगेही सांगूं शकतील. ह्मणून माझी अशी एक सूचना आहे कीं, वर्षास बक्षिसें देतात, त्यांत उत्तम वर्तनाबद्दल एक एक बक्षीस एक एक वर्गांत असावें, व तें ठरवितांना वर्गांतील मुलांचा अभिप्राय घ्यावा. ही सूचना कित्येकांस अग्राह्य, कारण अमलांत न येण्याजोगी, अशी वाटेल. परंतु माझा अनुभव उलट आहे. वर्गांतील मुलांस शिक्षकानें प्रेमानें पण आपला बोज राखून जर वागविलें तर वर्गांतील मुलांस एक प्रकारचा उदात्त अभिमान उत्पन्न होतो. तो उत्पन्न झाला ह्मणजे आचरणांत किंवा भाषणांत नीचपणा येऊं देण्याला तीं कचरतात व योग्य असेंच आचरण व भाषण करितात, असें मीं पाहिलें आहे. तेव्हां योग्य अभिप्राय देण्याला तीं योग्य होतीलच. वर्गांतील सर्व मुलांच्या मतांवरून जो वर्तनांत उत्तम ठरेल, त्यास केवढा योग्य अभिमान वाटेल?

बक्षिसांचे समारंभ.

शाळांत दर वर्षास बक्षिसें देण्यांत येतात, परंतु त्या वेळीं थाटाचा समारंभ सर्व शाळांत होत नाहीं. पूर्वीं कांहीं शाळांत होत होता, तेथेंही तो लोपत चालला आहे. हा जुना प्रचार लोपूं देतां कामा नये. बक्षीससमारंभ ह्मणजे वर्षसत्राचा अंत. त्या प्रसंगीं मुलांचे पालक, व गांवांतील प्रतिष्ठित गृहस्थ, व मुलींच्या संबंधानें गृहिणी, यांस अवश्य बोलवावें. शाळेची वार्षिक हकीकत तेथें सांगावी, अडचणी कळवाव्या, व जमल्यास त्यांजकडून निवारण करण्याचें आश्वासन मिळवावें. या योगानें शाळेविषयीं लोकांची सहानुभूति राहील, तिचें मोल बहुत आहे.

पालकांची सभा.

वर ह्मटलें आहे कीं, धर्मशिक्षणास पालकांनींही हातभार लावावा. तेव्हां जर धर्मविषयांत गुरूंचें व पालकांचें एक मत व्हावें, निदान त्यांत अत्यंत विरोध होऊं नये, असें जर इष्ट आहे, तर सल्लामसलत घेण्याकरितां पालकांची सभा निर्मिली पाहिजे. तींत प्रतिष्ठित पालकांचा समावेश व्हावा. तो निवडीनें व्हावा किंवा प्रतिनिधित्वाच्या तत्त्वावर व्हावा, हा प्रश्न तूर्त एकीकडे ठेवावा. अशी सभा असली ह्मणजे गुरूचें महत्त्व वाढेल. हल्लीं स्कूलकमिटी आहे, तींत क्वचित् पालक नसतात, व स्कूलकमिटीचें काम निराळें आहे व पालक सभेचें निराळें होईल, असा माझा समज आहे. पण कसेंही करा, गुरूला पालकांचा पाठिंबा पाहिजे, तो मिळेलसा करा, एवढाच माझ्या ह्मणण्याचा मुद्दा आहे. अशी पालकांची सभा असली ह्मणजे मुलांचें वर्तन, फीचे दर ठर-





अनुक्रमणिका

विणें, सुट्टया ठरविणें इत्यादि बाबतींत सरकाराला आपले वट हुकूम काढण्यापूर्वी पालकांचें मत घेण्याची सवड सांपडेल, व सरकार, गुरु, व पालक यांमध्यें मतविरोध होण्याचे प्रसंग कमी होतील. सणावारांच्या दिवशीं गुरूनें व जमल्यास या सभेंतील प्रतिष्ठित व योग्य पुरुषानें धर्मावर प्रसंगास अनुरूप व्याख्यान दिलें, व त्या वेळीं पालकांसही बोलाविलें तर किती चांगलें होईल. असें व्याख्यान देण्यास शाळेंत पुरेशी जागा नसेल तर एखादें मंदिरही चालेल. तात्पर्य, सर्वांच्या सलोख्यानें व होतां होईल तों एकमतानें शाळांतील शिक्षण चालेल, असें ध्येय पुढें ठेवून वागलें पाहिजे.

उपांगें. धर्मशिक्षणाचीं उपांगें.—उत्तम शाळागृह—सभोंवतीं बगीचा—मोठ्या शहराच्या मोहांपासून दूर वसति—भोजनवसतिगृहें—क्रीडास्थानें—विद्यार्थ्यांचे वादविवाद होतील अशा गुरूंनीं अधिष्ठित झालेल्या सभा—मुलांच्या करितां स्थापिलेलें ग्रंथालय—हीं होत. यासंबंधानेंही पुष्कळ बोलतां येईल. परंतु कालमर्यादेकडे लक्ष देऊन येथेंच थांबावें लागतें. व या बहुतेक खर्चाच्या बाबी पडल्या. शाळांतील खर्च वाढविण्याची तर सरकारची तयारी नाहीं. लोकही अजून उदासीन. तेव्हां अरण्यरुदित करून फायदा काय?

उपसंहार. या व्याख्यानांत ज्या मीं सूचना केल्या आहेत त्या माझ्या मतें आजच नाहीं तरी अल्पावकाशांत अमलांत आणण्याजोग्या आहेत. द्रव्याचें त्यांना पाठबळ नको आहे. मात्र उत्साहवंत धर्मनिष्ठ गुरूंची अपेक्षा आहे. तसे सर्वत्र न मिळाले तरी प्रत्येक जिल्ह्यांत प्रत्येक प्रकारच्या शाळेंत थोडेबहुत तरी मिळतील. जेथें ते आढळतील, किंवा आपण होऊन पुढें येतील, तेथें धर्मविषयाचें शिक्षण आरंभीं सुरू करावें. त्या विषयांत त्यानें कोणते प्राचीन अथवा प्राकृत ग्रंथ वाचावे यांचीं कांहीं नांवें दिलीं. हिंदु धर्माचीं ठोकळ तत्त्वें सांगितलीं. गुरूनें पालकांचें मत अनुकूल करून घेण्याचे कांहीं उपाय सुचविले. विद्यार्थ्यांशीं कसें वागावें याची अनुवृत्ति केली; कांहीं आक्षेपांस उत्तर दिलें; सरकार, पालक व गुरु यांनीं होतां होईल तों शिक्षणासंबंधीं एकमत करावें, हें सुचविलें. यांत देवघेवीचा प्रकार थोडा बहुत हाणें अपरिहार्य आहे. आपणच शहाणे हा हट्ट धरून बसून चालत नाहीं. अज्ञान मुलांची समजावणी करणें जर आईस प्राप्त आहे, तर अज्ञान ह्मणा, कोत्या समजुतीचे ह्मणा, विचित्र आचारविचारांचे ह्मणून अडाणी ह्मणा, पण पालकांची समजूत घालणें गुरूस व सरकारास इष्ट व अवश्य आहे. उपांगांसंबंधीं द्रव्याची अनुकूलता सरकाराकडून किंवा उदार धनिकांकडून होण्याची तूर्त आशा नसल्यानें, तें प्रकरण गाळलें. ती आशा उत्पन्न झाल्यास, व माझें आयुष्य व सामर्थ्य राहिल्यास, पुढें कदाचित् त्या प्रकरणावर अभिप्राय देण्याचा दैवयोग जुळून येईल!

**विष्णु मोरेश्वर महाजनि.**







अनुक्रमणिका

# पुस्तकपरीक्षा.

## "मराठी भाषेचे संप्रदाय व ह्मणी."

( मागील अंकावरून समाप्त. )

ह्मणी अनेक शब्दांनीं घटित असल्यामुळें व त्यांची उपपत्ति कळण्याचीं साधनें अनेक असल्यामुळें त्यांची व्युत्पत्ति फारशी अवघड नसते. प्रस्तुत पुस्तकांत ह्मणींची उपपत्ति द्यावयास पाहिजे परंतु दिली नाहीं, असें बहुधा झालें नाहीं. यास कांहीं अपवाद आहेत. 'उघड्या डोळ्यानें प्राण जात नाहीं. ' या ह्मणीच्या एका अर्थाची उपपत्ति दिली आहे, पण दुसऱ्या अर्थाची दिली नाहीं. 'आधींच तारे आणि त्यांत शिरलें वारें ' या ह्मणीची उपपत्ति न दिल्यामुळें ' तारे ' या शब्दाचा अर्थ ' आकाशांतून तुटणारा तारा ' किंवा ' तिरळें माणूस ' हा आहे हें कळण्यास मार्ग नाहीं. ' बावळी मुद्रा आणि देवळीं निद्रा ' ' मातीचे कुल्ले लाविल्यानें लागत नाहींत' ( याविषयीं एक गोष्ट ऐकल्यासारखी वाटते. ), ' बाब्या गेला आणि दशम्याही गेल्या, ' ' ज्याचें कुडें ( कूट अथवा कुडें मन ) त्याचे पुढें, ' ' शेरास सव्वाशेर' ( वाघ ), ' ढवळ्या शेजारीं बांधला पोंवळा, वाण नाहीं पण गुण लागला ' या ह्मणींचीही उपपत्ति देण्यासारखी असून दिली नाहीं. ' मांजराचे गळ्यांत घांट कोणीं बांधावी ' इत्यादि कांहीं ह्मणींचा इसापनीतीशीं किंवा इतर पुस्तकांशीं संबंध दाखविला नाहीं.

क्वचित् स्थलीं दिलेल्या उपपत्तीचा संप्रदायाशीं असलेला संबंध स्पष्ट केला नाहीं. उ०- 'हाडें उजविणें' याची व्युत्पत्ति ' लग्न झालेल्या माणसाच्या प्रेताला अविवाहित माणसापेक्षां एक संस्कार अधिक सांगितला आहे ' अशी दिली आहे. परंतु त्या संस्काराचा संप्रदायाशीं काय संबंध आहे तें कळत नाहीं.

कांहीं संप्रदायांची व्युत्पत्ति अपुरी दिली आहे. उ०-' कपिलाषष्ठीचा योग ' यांतील षष्ठीचा संबंध सहा योगांशीं आहे किंवा साठ वर्षांशीं हें द्यावयास पाहिजे होतें. 'मधून विस्तव न जाणें' या संप्रदायाचा, मधून विस्तव गेल्यास तंटा लागतो, या समजुतीशीं संबंध दाखविला आहे; परंतु त्यांतील 'न' या शब्दाची सार्थता सांगितली नाहीं. 'अन्नास मोताद' यांतील 'मोताद' या शब्दाचा अर्थ 'इयत्ता' असा दिला आहे. पण त्याचा संप्रदायाच्या अर्थाशीं काय संबंध हें स्पष्ट केलें नाहीं. या गोष्टींचा उलगडा अवश्य करावयास पाहिजे होता.

' ह्मशीनें पाय दिलेलें नाक ' या व इतर कांहीं संप्रदायांची व्युत्पत्ति देतांना ज्या गोष्टी दिल्या आहेत त्या काल्पनिक आहेत. त्यांची मुळींच आवश्यकता नव्हती.

कांहीं संप्रदायांची जी व्युत्पत्ति दिली आहे ती बरीच संशयात्मक आहे. 'इन मीन सवा तीन' यांतील पहिल्या अर्धाची 'ही ( बायको ) न ( आणि ) मी न ( आणि )' ही व्युत्पत्ति दिली आहे, व ती फार खुबीदार आहे यांत संशय नाहीं. परंतु दुसऱ्या अर्धाची 'स ( तो ) ह्मणजे मुलगा, वा ( अथवा ) ती ( मुलगी )' ही व्युत्पत्ति ठीक वाटत नाहीं. कारण हिच्याप्रमाणें शेवटच्या न चा संदर्भ लागत नाहीं. यापेक्षां ' सवा ' या शब्दाचा ' शिवाय ' असा अर्थ करून ('व्यवसाय' या शब्दाचा ' ववसा ' हा अपभ्रंश ज्या नियमानें झाला, त्याच नियमानें ' शिवाय ' चा ' सवा ' हा झाला असावा. 'शिवाय' चें हें अपभ्रष्ट रूप कांहीं प्रांतांत रूढ असलेलें दिसून येतें. ) तीन ह्मणजे नंबर तीनचें मूल असा अर्थ घेतल्यास मनाचें समाधान होईल असें वाटतें. ' चवदावें





अनुक्रमणिका

रत्न ;' याचा रा. आपटे यांनीं दैत्याला बसलेल्या माराशीं जो संबंध लाविला आहे तो सयुक्तिक वाटत नाहीं. 'पांचावर धारण बसणें' यांतील 'पांच' हा अर्थ पंचप्राणासंबंधानें योजिलेला नसून 'पांच शेर' या अर्थी योजिलेला दिसतो. पूर्वी रुपयास पांच शेर भाव अत्यंत महर्घतेच्या काळींच होत असे. 'नाकीं नऊ येणें' यांतील 'नऊ' हा शब्द 'नळ' या शब्दाचा अपभ्रंश आहे असें स्पष्टीकरण एका विद्वानानें दिलेलें आठवतें. 'हबेलंडी उडणें' यांतील प्रथम अक्षर 'हल' या शब्दाचा अपभ्रंश नसून 'हा' या शब्दाचा असावा असें वाटतें. 'गुलाबी थंडी' याची रा. आपटे यांनीं जी उपपत्ति दिली आहे तिच्यापेक्षां माफक थंडीचे दिवसांतच गुलाबांचा बहार असतो ही गोष्ट ह्या संप्रदायाच्या मुळाशीं असावी असें वाटतें. 'भ्रमाचा भोंपळा' यांत 'भ्रम' या शब्दाचा संबंध भोपळ्याच्या आंतील बियाशीं आहे किंवा त्याच्या अंगच्या कडूपणाशीं आहे हें नीट समजत नाहीं. कोहळ्यांत द्रव्य घालून ब्राह्मणांना गुप्त दान करण्याचा जो प्रचार आहे त्याशींही या संप्रदायाचा संबंध असावा. कांहीं प्रांतांत कोहळ्यास भोंपळा म्हणतात. जेथें याप्रमाणें दोन दोन तीन तीन प्रकारची व्युत्पत्ति असण्याचा संभव आहे तेथें सर्व प्रकार देणें इष्ट असतें.

कांहीं ठिकाणीं दिलेली व्युत्पत्ति चुकीची असावी असें वाटतें. यांपैकीं 'सूर्यवंशी' या शब्दाची व्युत्पत्ति आमच्या मतें काय पाहिजे हें वर दिलेंच आहे. 'आळशावर गंगा' याचा संबंध 'सगराचे साठ हजार पुत्र शापानें दग्ध होऊन पडले असतां भगीरथानें खालीं आणलेल्या गंगेचा ओघ त्यांच्या अंगावरून गेल्यामुळें त्यांचा उद्धार झाला' या कथेशीं रा. आपट्यांनीं जोडिला आहे, पण ही चूक आहे; कारण, शापदग्ध माणसांस आळशी म्हणतां येणार नाहीं. 'चुलीला अक्षत लागणें' या संप्रदायाची व्युत्पत्ति या पुस्तकांत अशी दिली आहे:— 'कोणतेंही धर्मकृत्य संपलें म्हणजे ब्राह्मण अक्षता टाकून तें संपलें असें सूचित करीत असतात.' पण या संप्रदायाच्या व्युत्पत्तीसाठीं इतक्या खोल पाण्यांत शिरण्याचें कारण नव्हतें. जेवणाचें आमंत्रण दिलें म्हणजे हातावर अक्षता ठेवीत असतात. चुलीला अक्षत मिळाली म्हणजे अर्थात् त्या चुलीवर जितक्या माणसांचा स्वैंपाक व्हावयाचा तितक्या सगळ्यांना आमंत्रण मिळाल्यासारखें झालें. 'राळ करणें' याचा मूळ अर्थ चुरा करणें ( व जाळून टाकणें ) असा उघड आहे. रा. आपटे म्हणतात, राळ 'उडविली म्हणजे त्याच्या ज्वाळा उंच वर जातात व दुसऱ्याला घाबरवून सोडतात, यावरून घाबरवून सोडणें........' 'रान खवळणें' याचा अर्थ 'रानांतील श्वापदें चारी दिशांस उधळलीं असतां जशी गडबड होते तशी गडबड पोटांत होणें' असा आहे. परंतु रा. आपट्यांनीं तो असा दिला आहे:—'रानांतील जनावरें....कावरींबावरीं होऊन रानोमाळ फिरतात त्याचप्रमाणें कावरेबावरे होणें.' 'हलवून खुंटा बळकट करणें' याची व्युत्पत्ति देतांना 'जात्याचा खुंटा नीट पक्का बसला आहे कीं नाहीं हें पहाण्यासाठीं तो हलवून पहातात व हलला तर पाचर मारून तो बळकट करतात' असें म्हटलें आहे. परंतु या संप्रदायांत पाचर मारून बळकट करण्याची कल्पना आहे असें वाटत नाहीं. खुंटा हलवितां हलवितां त्यास अनुकूल बैठक मिळाली म्हणजे तो आपोआप घट्ट बसतो, या गोष्टीशीं त्याचा संबंध आहे. 'तिमाजी नाईक' हा संप्रदाय 'मधली स्थिति' या कादंबरींतील त्या नांवच्या अत्यंत कृपण पात्रावरून पडला आहे असें रा. आपट्यांचें मत आहे. पण येथें




अनुक्रमणिका

धडधडीत कालविपर्यास दोष झाला आहे. कारण या कादंबरीपूर्वी बऱ्याच वर्षांपासून तिमाजी नाइकाचें प्रहसन होत होतें; व कदाचित् त्यापूर्वीही हा संप्रदाय निराळ्या कारणामुळें रूढ झालेला असावा. निदान ' मधली स्थिति ' या कादंबरींतील कृपणाचें नांव ' तिमाजी नाईक ' पडण्यास तें नांव त्यापूर्वींच ' कृपण ' या अर्थीं रूढ झालें होतें हें होय.

ज्या ह्मणीची व्युत्पत्ति विशेष चुकल्यासारखी वाटली अशी एकच आढळली; ती 'उंदराला मांजर साक्ष' ही होय. हिची उपपत्ति रा. आपट्यांनीं अशी दिली आहे:– 'मांजराला हें माहित असतें कीं, उंदराला संकटांतून सोडविण्यानें त्याच्यावर आपले उपकार होतील आणि त्याच्या माबदल्यांत आपणांस त्याला वाटेल तेव्हां खातां येईल.' ज्या संकटाला उंदीर भीत होता तेंच संकट उपकाराची फेड करण्याकरितां का होईना, तो आपणावर कशाला ओढून घेईल? वास्तविक उपपत्ति अशी असावीशी दिसते कीं, उंदराच्या तर्फे आपण साक्ष दिल्यावर तो आपणावर विश्वास ठेवून आपल्या समागमें न्यायसभेंतून घरीं जाऊं लागेल व मग त्याला रस्त्यानें सहज गट्ट करितां येईल असें मांजरास वाटलें होतें. अथवा फडताळांतील लोणी मिळण्याकरितां तें कुरतडण्याचे कामीं मांजरानें उंदराची योजना करून त्याच्या तर्फे साक्ष देण्याचें त्याजपाशीं कबूल करणें स्वाभाविक आहे, याचा संबंध सदरहू ह्मणीशीं असावा.

प्रस्तुत पुस्तकांत बऱ्याच संप्रदायांची व ह्मणींची व्युत्पत्ति फार समर्पक व मार्मिकपणाची दिली आह हें नमूद करण्यास आनंद वाटतो. मासल्याकरितां ह्मणून खालील भाषाप्रकारांची व्युत्पत्ति पहाण्याची आह्मी शिफारस करितों:– अलबत्या गलबत्या, आखाड सासरा, एळकोट, ढालगजभवानी, दुड्ढाचार्य, रुकार, साळसूद, शेंदाड शिपाई, बारा वाजणें, एका पायावर तयार असणें, कानाला खडा लावून घेणें, शिंगें असणें, हाडाचीं काडें करणें, तारांबळ होणें, पट्टीचा वैदिक, झक मारणें, तिरपिट उडणें, कुत्रा हाल खाईना, खाल्ल्या घरचे वासे मोजणें, थंडा फराळ, बडिजाव करणें, माशीला माशी, वज्रलेप होणें, शेर, तोंडाला पानें पुसणें, हात धुवून पाठीस लागणें, आपल्या कानीं सात बाळ्या, कानामागून आला आणि तिखट झाला (ही ह्मण पान व मिरची यांवरून निघाली असवी असा रा. आपट्यांचा तर्क आहे; परंतु कान व शिंग यांपासूनही ती निघाली असल्याचा संभव आहे.), अतिशहाणा त्याचा बैल रिकामा, गाढवापुढें वाचली गीता कालचा गोंधळ बरा होता, उतावळा नवरा, गुडघ्याला बाशिंग, आपला हात आणि जगन्नाथ, चोराच्या हातची लंगोटी, ताकापुरतें रामायण, तेल गेलें, तूप गेलें, हातीं धुपाटणें आलें केळीवर नारळी आणि घर चंद्रमोळी, घरचें झालें थोडें व्याह्यानें धाडलें घोडें.

व्युत्पत्तीबद्दल विस्तार झाला. पण हा विस्तार विषयाच्या योग्यतेपेक्षां अधिक झाला असें मात्र नाहीं. व्युत्पत्ति कळल्यानें संप्रदाय किंवा ह्मण स्मरणांत पक्केपणीं रहाते. कोणत्याही भाषाप्रचाराचा नुसता अर्थ माहित असतां वक्त्याकडून जितका जोराचा उच्चार होतो किंवा श्रोत्यावर जो ठसा उमटतो, त्यापेक्षां अधिक जोराचा उच्चार व अधिक खोल ठसा त्याचें व्युत्पत्तिज्ञान झालें असतां होतो. व्युत्पत्तीचें अज्ञान असतां पुष्कळदां संप्रदायाच्या किंवा ह्मणीच्या भलत्याच शब्दावर आघात पडतो. परंतु तिचें यथार्थ ज्ञान झालें असतां त्या चुकीची आपोआप दुरुस्ती होते. अमुक एका भाषाप्रचाराचा उपयोग गंभीर प्रसंगीं करण्या





अनुक्रमणिका

सारखा आहे किंवा मौजेच्या प्रसंगीं करण्यासारखा आहे हेंही व्युत्पत्तिज्ञानाबरोबर बारीक रीतीनें कळावयास लागतें. याप्रमाणें उपपत्तिज्ञानाचे अनेक उपयोग आहेत.

संप्रदायांचे व म्हणींचे अर्थ देण्यांत विशेष काळजी घ्यावी लागते. व्युत्पत्ति कळली नाहीं तर फायदा जरी झाला नाहीं तरी नुकसान होण्याचा संभव नसतो. परंतु अर्थाचा विपर्यास झाल्यास आपणांकडून हास्यास्पद प्रमाद होण्याचाही संभव असतो. या पुस्तकांत जे अर्थासंबंधानें दोष दिसून आले ते येथें देतों.

धातु मूळरूपभेदीं किंवा प्रयोजकभेदीं असेल त्याप्रमाणें त्याचा मराठींत किंवा इंग्रजींत अर्थ दिला पाहिजे. दोन्ही भेदीं असल्यास दोघांचे अर्थ पृथक्पणें दिले पाहिजेत. पण या संबंधानें प्रस्तुत पुस्तकांत बरीच उपेक्षा झाल्यासारखी दिसते. 'कान किटवणें—किटणें' असे दोन्ही संप्रदाय एकत्र देऊन त्यांचा अर्थ 'तीच ती गोष्ट पुनःपुनः सांगून कंटाळा आणणें' हा एकच दिला आहे. 'कानठाळ्या बसणें' याचा इंग्रजी पर्याय 'to stun the ear' हा दिला आहे. 'कसास लागणें' याचा अर्थ '....परीक्षा करणें' असा दिला आहे. अशा चुकांनीं मराठी जाणणारांचा जरी घोंटाळा झाला नाहीं तरी परदेशस्थ वाचकांचा गोंधळ उडून जाण्याचा संभव आहे.

'ग्रंथ' या शब्दाचा एक अर्थ 'बत्तीस अक्षरांचा समुदाय' असा दिला आहे. पण त्यानें 'अनुष्टप' (या वृत्ताचीं चारी चरणें मिळून बत्तीस अक्षरें असतात) हा अर्थ स्पष्ट होत नाहीं. संप्रदायांचा अर्थ साध्या शब्दांनींच दिला पाहिजे; दुसऱ्या संप्रदायांनीं दिल्यास स्पष्टीकरणाचा मूळ हेतु बाजूस रहातो. 'पांचामुखीं परमेश्वर' याचा अर्थ 'चार लोक म्हणतील तें खरें' असा या पुस्तकांत दिला आहे. यांतील 'चार लोक' हा एक संप्रदायच असून त्यांतील 'चार' या संख्यावाचक विशेषणाचा 'पांचा' या संख्यावाचक विशेषणाशीं विनाकारण संबंध जोडिला जाण्याचा संभव आहे. 'वर्दळीवर येणें' या संप्रदायाचा एक अर्थ 'हमरी तुमरीवर येणें' असा दिला आहे. हाही एक संप्रदायच आहे. 'माय विणें' याचा अर्थ निराळा न देतां उदाहरणाच्या रूपानें विशद करितांना 'कोणाची छाती होते तें पाहीन' असें स्पष्टीकरण दिलें आहे. 'अस्मान् ठेंगणें होणें' याचा अर्थ 'स्वर्ग दोन बोटें उरणें' असा दिला आहे. मात्र लागलींच पुढें त्याचा साध्या शब्दांनींही अर्थ दिला आहे. 'पुराणांतलीं वांगीं पुराणांत' या म्हणीची केवळ उपपत्ति देऊन अर्थ मुळींच दिला नाहीं. हा नुस्ता घाईचा परिणाम दिसतो.

कांहीं स्थलीं अर्थ देतांना योग्य शब्दांची योजना झाली नाहीं. उ० 'ठाव ना ठिकाण' याचा अर्थ 'पत्ता नाहीं' असा द्यावयाचा असून तो 'पत्ता नसणें' असा दिला आहे. 'दादा बाबा करणें' याचा अर्थ 'गोड बोलून व कुरवाळून मन वळविणें' असा दिला आहे; तो 'मन वळविण्याकरितां गोड बोलणें' असा पाहिजे होता. 'डोळ्यांत मावणें' या शब्दांचा उपयोग स्पष्ट करितांना रा. आपटे म्हणतातः—"एखाद्यानें डोळे वटारले असतां 'खुशाल डोळे वटार मी तुझ्या रागाला भीत नाहीं' अशा अर्थानें या संप्रदायाचा उपयोग करितात." खरें पाहूं गेलें तर या संप्रदायास 'नाहीं' हा नकारार्थी शब्द लाविल्यावांचून त्याचा तसा उपयोग करितां येत नाहीं. 'दोन डोळे शेजारीं भेट नाहीं संसारीं' या म्हणीचा अर्थ देतांना 'एखादा मित्र जवळच रहात असून क्वचित् काळीं त्याची भेट होत असली म्हणजे या म्हणीचा उपयोग करितात—' या स्पष्टीकरणांत 'क्वचित्काळीं' याबद्दल



'क्वचितच' असा शब्द असता ह्मणजे अर्थ स्पष्ट झाला असता. 'खाऊन माजावें, टाकून माजूं नये' या ह्मणीचा अर्थ देतांना 'माजणें' या धातूचे 'पुष्ट होणें' व 'माजोरी होणें' असे दोन अर्थ स्पष्टपणें दाखवावयास पाहिजे होते. ते दाखविले नाहींत.

कांहीं ठिकाणीं अर्थ मर्यादित असून त्याची मर्यादा न दिल्यामुळें त्याची व्याप्ति आहे त्यापेक्षां अधिक असावी असा भ्रम उत्पन्न होतो. 'मगरमिठी' या शब्दाचा अर्थ 'कायमचा संबंध' हा नसून 'जाचक व लवकर न सुटणारा संबंध' असा पाहिजे. 'अहो रूपमहो ध्वनिः' याचा 'परस्परांनीं परस्परांची स्तुति करणें' असा जो अर्थ दिला आहे त्यांत 'अवास्तव' हें 'स्तुतीचें' विशेषण पाहिजे होतें. 'शिकंदर' या शब्दाचा उपरोधिक अर्थानें नशिबासंबंधानेंच उपयोग करितात. 'कानांत सांगणें' हा संप्रदाय चुगलखोरांसंबंधानेंच उपयोगांत आणितात. 'स्वर वहाणें' याचा अर्थ 'अनुकूल मत होणें' असा जो दिला आहे त्यापेक्षां अधिक मर्यादित अर्थ आहे. 'एरंडाचें गुऱ्हाळ' याचा अर्थ 'निष्फळ प्रयत्न' असा नसून त्याचा उपयोग बोलण्या लिहिण्यासंबंधानेंच करितात. 'राग नाकावर असणें' यावरून संवय दिसून येते. 'वाचा विटाळणें' याचा अर्थ केवळ 'शब्द खर्चणें' असा नसून 'शब्द अस्थानीं खर्चणें' असा आहे. 'गुलदस्तांत ठेवणें' याचा अर्थ 'प्रसंगीं उपयोगांत आणण्याकरितां गुप्त ह्मणून राखून ठेवणें' असा असून नुस्ता 'राखून ठेवणें' असाच दिला आहे. याप्रमाणें या संप्रदायांचे अर्थ नियत असून तसे असलेले प्रस्तुत पुस्तकांत दिले नाहींत.

कांहीं संप्रदायांचा उपयोग निंदार्थी होत असून तसा असलेला दिला नाहीं. उ० 'ढुंगणाला हात पोंचणें', 'हात पोंचणें', 'स्वर्गास हात पोंचणें', 'स्वर्गीं ध्वज लावणें', 'उजेड पाडणें' हे संप्रदाय पहावे.

कांहीं ठिकाणीं याच्या उलट प्रकार झाला आहे; ह्मणजे संप्रदायाचा अर्थ विस्तृत असून त्याचा विनाकारण संकोच केला आहे. उदाहणार्थ 'मी ह्मणणें.' हा संप्रदाय नुसत्या पावसासंबंधानेंच उपयोगांत आणितात असें नाहीं. परंतु प्रस्तुत पुस्तकांत 'पाऊस ह्मणतो मी' असें त्याचें मर्यादित रूपच दिलें आहे; 'वाहत्या गंगेंत हात धुणें' याचा 'कोणाचें नुकसान न करतां सहजगत्या होण्यासारखा आपला फायदा करून घेणें' असा अर्थ देऊन त्यापैकीं उत्तरार्धाचा पूर्वार्धानें ('कोणाचें नुकसान न करतां' या शब्दांनीं) विनाकारण संकोच केला आहे. 'चुडेदान देणें' याचा अर्थ 'पतीचे प्राण वांचविणें' हा असून तो 'एखाद्या स्त्रीच्या पतीस मारण्याची संधि आली असतां तिच्या सौभाग्याकडे लक्ष देऊन त्याचे प्राण वांचविणें' असा संकुचित स्वरूपाचा दिला आहे. 'पदरचें घालणें' हा संप्रदाय कोणत्याही वर्णनासंबंधानें उपयोगांत आणण्यासारखा असून त्यास विनाकारण ग्रंथाची मर्यादा घालून दिली आहे.

अनेक संप्रदायांस दोन किंवा अधिक अर्थ असतात, हे अर्थ बहुधा वाच्य व लक्ष्य अशा उभयविध स्वरूपाचे असतात. यांपैकीं एकच अर्थ दिला असून बाकीचे दिले नाहींत असें या पुस्तकांत कांहीं ठिकाणीं दिसून आलें. खालीं दिलेल्या उदाहरणांत न दिलेले अर्थ कंसांत दिले आहेत; 'माभळभट्टी' (अजागळपणा), 'लटपटपंची' (लबाडी), 'कुबेर' (दाता), 'काखा वर करणें' (नामानिराळे आहोंत असें दाखविणें), 'कानांत तुळशीपत्र घालणें' (अलिप्त असणें), 'तोंडघशीं पडणें' (फसणें), 'दांत खाणें' (द्वेष करणें), 'बोकांडीस बसणें' (करण्याला भाग पाडणें),



'हातघाईवर येणें' (निकरावर येणें), 'होळीचे होळकर' (तात्पुरत्या लग्न्यासाठीं जमलेले लोक), 'अंग चोरणें' (दुसरा जवळून जाऊं लागला असतां त्यास स्पर्श न होईल अशा रीतीनें अंगाचा संकोच करणें,) 'काळें करणें' (निघून जाणें), 'पोळी पिकणें' (भरभराट होणें), 'फुटाणे भाजणें' (काम जलद उरकणें), 'मक्ता घेणें' (एकटेच करण्याचा अधिकार स्वतःकडे घेणें), 'मसणांत गोवऱ्या जाणें' (पराकाष्ठेचा ह्यातारा असणें), 'रंगास येणें' (चांगल्या स्थितीप्रत जाणें).

कांहीं संप्रदायाचे व ह्मणींचे अर्थ चुकीचे असावेसे वाटतात. खालीं असे संप्रदाय व ह्मणी, त्यांचे या पुस्तकांत दिलेले अर्थ व आमच्या मतें असलेले अर्थ दिले आहेत.

| संप्रदाय. | पुस्तकांतील अर्थ. | आमच्या मतें असलेले अर्थ. |
|---|---|---|
| १ काका दुसरा. | १ त्याच्यासारखा दुसरा कोणी. | १ त्याजहून अधिक असा दुसरा कोणी. |
| २ कोटकल्याण. | २ पराकाष्ठेचें किंवा पूर्ण कल्याण (समाधान). | २ पराकाष्ठेचें कल्याण. |
| ३ मानभाव. | ३ दिसण्यांत साळसूद व गरीब. | ३ कपटी. |
| ४ दत्त ह्मणून उभें रहाणें. | ४ एखाद्या कार्याच्या सिद्धीसाठीं खटपट न करितां केवळ उपभोगापुरतें किंवा मनीं मानसीं नसतां एकाएकीं आयते वेळीं येऊन हजर होणें. | ४ एकाएकीं उभें रहाणें. |
| ५ कपाळाचें कातडें नेणें. | ५ सगळ्या जन्माचें मातेरें करणें. | ५ भरून न येणारें नुकसान करणें. |
| ६ जीभ चावणें. | ६ एखादी गोष्ट बोलावयाची नसतां बोलून गेलों असें दाखविणें. | ६ जीभ चावून बोलणें मध्येंच थांबवणें. |
| ७ तोंड भरून बोलणें. | ७ दुसऱ्याचें व आपलें समाधान होण्याजोगें बोलणें. | ७ मोकळ्या मनानें बोलणें. |
| ८ तोंडाची वाफ दवडणें. | ८ बोलणें निष्फळ होणें. | ८ निरर्थक बोलणें. |
| ९ नाकावर माशी बसूं न देणें. | ९ चिडीस जाणें. | ९ चिरडखोर असणें. |
| १० पंख फुटणें. | १० उडून जाणें, लबाडीनें पळून जाणें. | १० बेपर्वाई दाखविणें. |
| ११ पोटांत शिरणें. | ११ मर्जी संपादन करणें. | ११ विश्वास संपादन करणें. |
| १२ हात धरणें. | १२ वरचढ करणें. | १२ बरोबरी करणें. |
| १३ मात्रा न चालणें. | १३ कोणाच्याही मतास मान न मिळणें, एकाच्या चातुर्यामुळें दुसऱ्याचें चातुर्य फुकट जाणें. | १३ बळ न चालणें. |
| १४ निमित्तास टेकणें. | १४ एकादें काम बिघडावें ह्मणून निमित्त शोधणें. | १४ सुटका व्हावी ह्मणून निमित्त शोधणें. |
| १५ उकळी फुटणें. | १५ आवेशपूर्वक अंतःकरणाची अनुकूल प्रवृत्ति होणें. | १५ मनोवृत्ति उंचबळणें. |
| १६ उठतां लाथ बसतां बुक्की. | १६ सदासर्वदा माराचा धाक. | १६ सदासर्वदा मार. |
| १७ उणें पुरें. | १७ विविक्षित प्रमाणापेक्षां कांहीं उणें. | १७ थोडेंसें कमी किंवा अधिक. |
| १८ गाळीव मूर्ति. | १८ अट्टल सोदा. | १८ धूर्त, लबाड. |





अनुक्रमणिका

| | | |
|---|---|---|
| १९ चकार शब्द. | १९ पुढें आणखी कांहीं एक बोलावयाचें तें. | १९ कांहींएक, एक शब्दही. |
| २० जीव टांगणीस लागणें. | २० एखाद्या वस्तूवर प्रीति बसणें. | २० एखाद्या वस्तूसंबंधानें काळजी लागणें. |
| २१ प्रस्थान करणें–ठेवणें. | २१ जावयास निघणें. | २१ जाण्याची पूर्वतयारी करणें. |
| २२ फुटाण्यासारखा उडणें. | २२ रागामुळें त्वरेनें कांहीं कार्यास प्रवृत्त होणें. | २२ रागानें किंवा तोऱ्यानें पदोपदीं उसळणें. |
| २३ भोग येणें. | २३ दैवदशेनें सुखदुःखादि नशिबीं येणें. | २३ दुःख नशिबीं येणें. |
| २४ राक्षसी झोंप. | २४ फार गाढ झोंप. | २४ फार गाढ व दीर्घ झोंप. |

| ह्मणी. | पुस्तकांतील अर्थ. | आमच्या मतें असलेले अर्थ. |
|---|---|---|
| १ अगे अगे ह्मशी मला कां नेशी. | १ कांही तरी पोकळ सबब सांगून आपली फजिती छपविण्याचा यत्न करणें. | १ एखादी गोष्ट स्वेच्छेनें करीत असतां ती इतरांच्या आग्रहावरून करीत आहोंत असा बहाणा करणें. |
| २ कुचेष्टेवांचून प्रतिष्ठा नाहीं. | २ जगांत प्रतिष्ठा मिळवावयाची असेल तर कांहीं तरी अलौकिक कृत्य केलें पाहिजे. त्यावांचून ती मिळत नाहीं. | २ जगांत......तरी लोकांच्या नजरेस येण्यासारखें व पोकळ डौलाचें कृत्य केलें पाहिजे.......नाहीं. |
| ३ कुंभाराची सून कधीं तरी उकिरड्यावर येईलच. | ३ जी व्हावयाची अशी एखादी गोष्ट आज नाहीं उद्यां होईलच. | ३ जी गोष्ट उघडकीला यावयाची ती आज नाहीं उद्यां उघडकीला येणारच. |

'वयांत येणें' या संप्रदायाचा अर्थ देतांना 'कायद्यानें मुलगी १८ वर्षांनंतर आणि मुलगा २० वर्षें पूर्ण झाल्यावर वयांत येतो असें समजतात' असें एक चुकीचें विधान केलें आहे. त्याकडे कर्त्यांनीं लक्ष पुरवावें. एकंदर पुस्तकाच्या मानानें वरील अर्थासंबंधीं चुका फारच थोड्या आहेत. त्या येथें बारकाईनें देण्याचें कारण इतकेंच कीं, प्रस्तुत पुस्तकाची दुसरी आवृत्ति निघण्याचा सुयोग आल्यास (व तो लौकरच येईल अशी आमची खात्री आहे.) त्यांत लहानसहान दोषही राहूं नयेत. या पुस्तकांत ज्या संप्रदायांचे व ह्मणींचे अर्थ अगदीं बरोबर व मोजक्या शब्दांनीं दिले आहेत अशांचीं बरींच उदाहरणें देतां येतील. मासल्याकरितां वाचकांनीं 'कांगावा करणें' 'घालून पाडून बोलणें' या संप्रदायांचे व 'हलवून खुंटा बळकट करणें' या ह्मणीचा अर्थ पहावा.

कांहीं शब्दांचे व संप्रदायांचे अर्थ परस्परविरुद्ध असतात. उदाहरणार्थ 'बसणें' हा शब्द घ्यावा. याचे अर्थ 'भरभराटीस येणें' व 'नाशाच्या पंथाला लागणें' असे अगदीं परस्परविरुद्ध आहेत. यांचीं उदाहरणें अनुक्रमें 'त्याचा धंदा आतां चांगला बसल्यासारखा आहे' व 'त्याचा धंदा समूळ बसला' हीं होत. एखादी हलकी वस्तु जमिनीवर ठेविली असतां तिचे प्रथम हेलकावे जातां जातां अखेरीस तिला स्थितिस्थापकता येते या गोष्टीवरून पहिला अर्थ निघाला आहे. दुसरा अर्थ इमारत खचली असतां बसल्यासारखी दिसते यावरून निघाला आहे. सारांश, भूमीशीं समांतर व ऊर्ध्वाधर अशा उभयविध गतीवरून या दोन अर्थांची उत्पत्ति झाली आहे. अशा मासल्याचे विरुद्धार्थक दोन संप्रदाय या पुस्तकांत आढळले. एक 'कंठ फुटणें' व दुसरा 'वाढणें-वाढवणें' (हा शब्द पुरुष 'बंद करणें' या अर्थीं दुकानास लावितात व स्त्रिया 'पुसणें' 'फुटणें' 'या अर्थीं अनुक्रमें कुंकवास व बांगड्यांस लावितात)



अशा मौजेच्या संप्रदायांचें एक परिशिष्ट शेवटीं दिलें असतें तर बरें झालें असतें.

रा. आपट्यांनीं बऱ्याच संप्रदायांचे व ह्मणींचे इंग्रजी अर्थ किंवा पर्याय दिले आहेत. सगळ्यांचे कां दिले नाहींत हें कळत नाहीं. दिले असते तर परदेशस्थ वाचकांसही या पुस्तकाचा लाभ घेतां आला असता. दिलेल्यांपैकीं कांहीं संप्रदायांचे व ह्मणींचे अर्थ चुकलेले आढळले. 'कानशिलांत देणें' वगैरे एकाच अर्थीं चार ह्मणींचा अर्थ इंग्रजींत 'to slap on the ear' असा दिला आहे. येथें ear या शब्दाबद्दल temple हा शब्द पाहिजे होता. 'पाय पसरणें' याचा अर्थ 'to establish one's power far and wide,' 'या बोटाची थुंकी त्या बोटावर करणें' याचा अर्थ 'to contrive to evade blame' व 'पोटांतून कळवळा येणें' याचा 'to yearn' असा दिला आहे. हे अर्थ बरोबर नाहींत. 'विधिनिषेध नसणें' याचा एक अर्थ 'to rise superior to all laws' असा दिला आहे. पण मुळांतील कुत्सितार्थ त्यानें व्यक्त होत नाहीं. 'उखाळ्यापाखाळ्या काढणें' याचा एक अर्थ 'to hold up one's foibles to redicule' असा दिला आहे. पण one's या शब्दावरून 'परस्परांचे' हा अर्थ निघत नाहीं. 'पाण्याचा कांटा मोडणें' याचा अर्थ मराठींत 'अग्निसंयोगानें तें किंचित् उष्ण होणें' असा मूळरूपभेदीं दिला आहे; परंतु तोच इंग्रजींत 'to take off the chill of water' असा प्रयोगक्रमभेदीं दिला आहे. 'फावड्यानें पैसे ओढणें' याचा एक पर्याय 'to roll in wealth' व 'सुतास लागणें' याचा 'to be in good order and regularity' असा स्थितिपर दिला आहे, तो कृतिपर पाहिजे होता. 'पिकलें पान' याचा अर्थ 'green old age' हा दिला आहे, तो उघड उघड चुकला आहे. 'घोडा मैदान जवळ आहे' याचा 'the hour has come and also the man' हा दिलेला अर्थ बरोबर वाटत नाहीं.

कांहीं भाषाप्रचारांसमोर सदृश अर्थाचे इतर प्रचार तुलनेसाठीं दिले आहेत. ते अधिक असते तर विशेष चांगलें झालें असतें. उ० 'कडू कारलें तुपांत तळलें साखरेंत घोळलें तरी कडू तें कडूच' व 'कुत्र्याचें शेंपूट नळकांड्यांत घातलें तरी वांकडें तें वांकडेंच' या ह्मणी परस्परांसमोर द्यावयास पाहिजे होत्या. 'आठ पुरभय्ये नऊ चौके' या ह्मणीसमोर 'मूर्ति तितक्या प्रकृति' ही ह्मण सदृश ह्मणून दिली आहे. पण दोघींचे अर्थ अगदीं भिन्न आहेत.

संप्रदाय व ह्मणी यांचा उपयोग कसा होतो हें दाखविण्याकरितां रा. आपट्यांनीं उदाहरणें दिलीं आहेत. पण प्रत्येक संप्रदायास व ह्मणीस उदाहरण दिलें नाहीं. संप्रदायांचा प्रयोग करतांना त्यांजशीं संबद्ध असलेल्या इतर शब्दांच्या रूपांसंबंधानें अनेकदां नियम असतो, ह्मणून प्रत्येक संप्रदायामागें एक एक उदाहरण द्यावयास पाहिजे होतें. ह्मणींचा तसा प्रकार नाहीं. त्या स्वतंत्र असल्यामुळें त्यांचीं निराळीं उदाहरणें देण्याचें प्रयोजन नसतें. संप्रदायांचीं जीं उदाहरणें दिलीं आहेत, त्यांपैकीं बरींच त्या संप्रदायांचा अर्थ संकुचित असून तो नीटरीतीनें व्यक्त झालेला नाहीं ह्मणून व्यक्त करण्याकरितांच दिलेलीं दिसतात. जसें 'नाकावर असणें' हा संप्रदाय रागासंबंधानेंच उपयोगांत येतो; परंतु ही गोष्ट त्या संप्रदायाच्या अर्थांत दिली नसून उदाहरणांत दर्शविली आहे. उदहरणांपैकीं कांहीं कर्त्यानें त्या त्या प्रसंगासाठीं स्वतः तयार केलेलीं असून इतर दुसऱ्या ग्रंथकर्त्यांच्या पुस्तकांतून घेतलीं आहेत. परंतु या पुस्तकांची संख्या फार मर्या-






अनुक्रमणिका

दित आहे; ती पुढील आवृत्तींत अधिक होईल अशी आशा आहे. शिवाय जान्सनच्या शब्द-कोशांतल्याप्रमाणें उदाहरणें उपयोग दर्शवून स्वतंत्रपणेंही आहेत त्यापेक्षां बोधपर व सुभाषितरूप असतीं तर दुधांत साखर पडली असती. ही सूचनाही पुढील आवृत्तींत अवश्य अमलांत आणण्यासारखी आहे. हें काम एकट्याचें नाहीं. अनेकांनीं यास हातभार लाविला पाहिजे.

क्वचित् स्थलीं उदाहरणें समर्पक पडलीं नाहींत. 'पाणी पाणी होणें' याचा अर्थ 'रक्ताचें पाणी होणें—ह्मणजे अतिशय मेहनत करावी लागणें' असा देऊन 'हें कठोर मांस झडून जाईल तर किंवा याचें पाणी पाणी होईल तर किती बहार होईल' हें वाक्य उदाहरणादाखल दिलें आहे; परंतु उदाहरणांत त्या संप्रदायाचा अर्थ 'अतिशय मेहनत करावी लागणें' असा नाहीं. 'तोंड धरून बुक्क्यांचा मार' या ह्मणीचें उदाहरण 'बायकांचा जन्म ह्मणजे तोंड दाबून बुक्क्यांचा मार ह्मणतात तें अक्षरशः खरें आहे' हें दिलें आहे; पण उदाहरणांतील संप्रदाय 'तोंड दाबून बुक्क्यांचा मार' हा मूळ दिलेल्या संप्रदायाहून भिन्न आहे.

प्रस्तुत पुस्तकांत क्वचित् स्थलीं मुद्रणादि दोष आढळून आले तेही येथें देणें जरूर आहे. 'दुनिया झुकती है, झुकानेवाला चाहिये' या ह्मणीचा अर्थ 'लोकांना नादीं लागावयाला कांहीं उशीर लागत नाहीं. नादीं लागणारा मात्र पाहिजे' असा दिला आहे. येथें 'लागणारा' या शब्दाबद्दल 'लावणारा' हा शब्द पाहिजे होता. 'उडत्या पाखराचीं पिसें मोडणारा' असा संप्रदाय दिला आहे, तो 'उडत्या........मोजणारा' असा पाहिजे होता. या पुस्तकांतील 'एकशब्दात्मक व इतर संप्रदाय' हें दुसरें प्रकरण संपून 'पौराणिक, ऐतिहासिक किंवा इतर कथांवरून निघालेले संप्रदाय' हें तिसरें प्रकरण चालू झालें असतांही प्रत्येक विषम अंकाच्या पृष्ठावर पूर्वोक्त प्रकरणाचा मथळाच चुकीनें दिला आहे. 'मनःपूतं समाचरेत्' या संप्रदायात्मक वाक्याचें उदाहरण त्यापुढील 'मधु तिष्ठति जिव्हाग्रे हृदये तु हलाहलम्' या वाक्यानंतर दिलें आहे. प्रस्तुत सारख्या कोशादि पुस्तकांत मुद्रणदोषांस फार जपलें पाहिजे हें आह्मी रा. आपट्यांस सांगितलें पाहिजे असें नाहीं.

याशिवाय कांहीं किरकोळ दोष आहेत. तेही येथें टीकेच्या पूर्णतेसाठीं दिले पाहिजेत. 'वेळेनसार' या संप्रदायाचें शुद्ध रूप 'वेळेनुसार' असें दिलें आहे; तें चुकीचें आहे. जांबुवंत हा रामचंद्राच्या वानरसेनेपैकीं एक वृद्ध कपि होता असें पृ. ३८ वर दिलें आहे; पण तो अस्वल होता. 'शापादपि शरादपि' हे शब्द प्रथम द्रोणाचार्यांना लावीत असें रा. आपटे ह्मणतात; पण तें त्यांच्यापूर्वी परशुरामास लावीत असावे असा तर्क होतो. साडेतीन मुहूर्तांत नागपंचमीचा समावेश केला आहे. तिच्या जागीं अक्षय्य तृतीया पाहिजे. 'उदक सोडणें' याची उपपत्ति देतांना 'ब्राह्मणभोजनाचे वेळीं यजमान पात्रें प्रोक्षण करून उदक सोडतो' असें ह्मटलें आहे. परंतु उदक सोडण्याची क्रिया ब्राह्मणभोजनाशिवाय इतर प्रसंगींही केली जाते; असें असतां तिचा त्याच्याशींच विशेष संबंध लावण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. 'चुलीला अक्षत लागणें' या संप्रदायाचा अर्थ 'घरांतल्या माणसांना दुसरीकडे जेवावयास जावयाचें असल्यामुळें चुलीनें न पेटतां राहणें' असा दिला आहे. परंतु यांतील पहिल्या दोन शब्दांच्या मध्यें 'सर्व' हा शब्द आवश्यक असून गाळिला आहे. अशा लहानसहान दोषांचें महत्त्व कोशादि पुस्तकांत फार असतें. 'तत्त्वमसीशीं गांठ घालणें' याची उपपत्ति देतांना "तत्त्वमसि' हें नांव ब्रह्माला






अनुक्रमणिका

आहे"; असें लिहिलें आहे तें चुकीचें आहे. 'पासंगास न पुरणें' याची उपपत्ति देतांना प्रथम पासंगाचा अर्थ दिला आहे; पण तो अर्थ पासंगाचाच आहे हें कळण्यास मार्ग नाहीं. 'इळ्या भोंपळ्या इतकें सूत' या संप्रदायाची उपपत्ति देतांना 'इळा ( विळा ) हें भोंपळा फोडण्याचें शस्त्र आहे' असें लिहिलें आहे; येथें 'फोडण्याचें' याचे ऐवजीं 'चिरण्याचें' हा शब्द पाहिजे होता. 'मरण नाहीं' याचा अर्थ 'शंका नाहीं' असा दिला आहे, तो 'खोट नाहीं' असा पाहिजे होता. 'शंका' हा शब्द फार संदिग्ध आहे.

आह्मीं येथपर्यंत जे प्रस्तुत पुस्तकांतील दोष दाखविले आहेत, त्यांपैकीं अनेक दोष वाचकांस क्षुल्लक वाटतील. परंतु कोशासारख्या प्रमाणभूत ग्रंथांत क्षुल्लक दोषांचेंही महत्त्व फार असतें. त्या कोशांत एखाद्या शब्दाचा किंवा संप्रदायाचा चुकीचा अर्थ पडला ह्मणजे ज्या ज्या माणसाच्या हातीं तो कोश पडतो, त्याचा त्याचा त्याच्या अर्थाविषयीं चुकीचा ग्रह होऊन बसतो. सामान्य पुस्तकाविषयीं सामान्य वाचकांची जी दोषदृष्टि असते, ती कोशासंबंधानें रहात नाहीं. कारण, कोशकारानें त्या कोशांतील ज्ञानभांडाराचा संग्रह करितांना किती तरी परिश्रम केले असले पाहिजेत व प्रसिद्धीपूर्वीं अनेक ज्ञात्यांस तें दाखविलें असलें पाहिजे, असा त्यांचा समज असतो. शिवाय, कोशासारखे ग्रंथ वारंवार निर्माण होत नसतात. मोलस्वर्थ, क्यांडी यांचे कोश जन्मास येऊन किती तरी वर्षें झालीं; तथापि त्यांचें प्रामाण्य अजून कायम आहे. अशा ग्रंथांत कांहीं दोष असले तरी त्यांजविषयीं 'वृद्धास्ते न विचारणीयचरिताः' अशी अंधश्रद्धाच वाचकांचे मनांत जागरूक असते. तेव्हां या श्रद्धेस अनुरूप अशी खबरदारी घेणें हें कोशकाराचें कर्तव्य असतें. जों जों त्या श्रद्धेची अंधता अधिक, तों तों त्या कर्तव्याची जागरूकताही अधिक असली पाहिजे.

अर्थात् चुका राहिल्यानें जसे लागलेच अनिष्ट परिणाम होतात, तसे व्युत्पत्तींत व वर्गीकरणांत घडलेल्या दोषांनीं होत नाहींत. व्युत्पत्ति देत गेल्यानें वाचकांमध्यें जी तीव्र कुतुहलबुद्धि उत्पन्न होते, तीच त्या दोषाचें स्वरूप प्रकट करण्यास समर्थ असते. सदोष वर्गीकरणापासूनही तादृश अनिष्ट परिणाम घडून येण्यासारखे नसतात. परंतु त्यांपासून विद्यार्थ्यांच्या मनावर एक कायमचा अनिष्ट संस्कार होतो. तो हाच कीं त्यांस अव्यवस्थितपणाचें वळण लागतें. कोणतीही गोष्ट शिस्तवार करण्याची संवय विद्यार्थ्यांस लागणें अत्यंत आवश्यक असतें. सुव्यवस्थित रीतीनें मिळालेलें ज्ञान स्मरणांत सुलभपणें राहून योग्य प्रसंगीं उपयोगांतही ताबडतोब आणितां येतें. हा सुव्यवस्थितपणाचा धडा योग्य वर्गीकरणानें मिळतो. व्युत्पत्तीची गोडी लागल्यानें भाषेचें प्रगतिपर (dynamical) ज्ञान करून घेण्याकडे जशी प्रवृत्ति होते, तशी सुंदर वर्गीकरणानें तिचें संस्थितिपर (statical) ज्ञान संपादण्याकडे प्रवृत्ति होते.

वर दाखविलेले दोष संकलित केल्यामुळें जरी विपुल वाटले, तरी ते पुस्तकांतील गुणांच्या मानानें कांहींच नव्हत, हें अखेरीस सांगणें जरूर आहे. आह्मीं या टीकेंत दोष सामग्र्यानें दिल्याकारणानें ते वगळले असतां बाकीचें पुस्तक गुणमयच आहे हें उघड आहे. टीकाविषय ग्रंथच मोठा असल्यामुळें त्यांतील दोषांची संख्या साहजिकच मोठी झाली. परंतु ती निरपेक्षपणें जरी मोठी दिसली, तरी सापेक्षपणें ह्मणजे सबंध ग्रंथाच्या किंवा त्यांतील गुणांच्या विस्ताराच्या मानानें फारच अल्प ठरेल अशी आमची खात्री आहे. आह्मीं या टीकेंत बहुतकरून दोषां-



चीच याद दिली आहे याचें कारणही ते दोष अल्पसंख्याक आहेत हेंच आहे. कोणत्याही शास्त्रांत नियमाचें उदाहरण एखादेंच देऊन अपवादांची मात्र खानेसुमारी बारकाईनें करण्यांत येते, याचें जें कारण तेंच आह्मीं केलेल्या दोषविस्ताराचें आहे. या पुस्तकांत गुण कमी व दोष अधिक असते तर आह्मीं उलट प्रकार केला असता, ह्मणजे गुणांची समग्र याद देऊन दोषांची एका वाक्यांत विल्हेवाट लाविली असती. Exception proves the rule (ह्मणजे अपवादावरून नियमाची सत्यता सिद्ध होते) या न्यायानें या टीकेकडे दृष्टि ठेवण्याची वाचकांस विनंती आहे. तिच्यांत दाखविलेले दोष जरी अल्पप्रमाण आहेत, तरी ते दूर केल्यास पुस्तक सर्वांगसुंदर होईल व ते लीलेनें दूर करण्यास त्याचे विद्वान् कर्ते पूर्णपणें समर्थ आहेत हें जाणूनच इतका विस्तार केला आहे. आह्मीं ज्या भावानें ही टीका लिहिली आहे, त्याच भावानें ते हिचें मनन करतील अशी खात्री आहे. या टीकेंत आह्मांकडूनही कांहीं दोष घडले असतील; घडले असल्यास भाषेचा विचार करितांना दोष कसे अपरिहार्य असतात याचें तें एक उत्कृष्ट उदाहरणच होईल. या पुस्तकांतील तिसरें, सहावें, दहावें व अकरावें हीं प्रकरणें बरींच मनोरंजक असून तीं अवश्य वाचण्याची आह्मी वाचकांस शिफारस करितों.

प्रस्तुत पुस्तकासारखें पुस्तक आजपर्यंत न होण्याचें कारण देतांना रा. आपटे प्रस्तावनेंत ह्मणतातः—'येवढी जीवाची यातायात करून आणि शिरावर जडजोखीम घेऊन एखाद्यानें संप्रदाय व ह्मणी यांचें सोपपत्तिक विवेचन करणारें असें पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें तर त्याला फाडून खाणारे निष्ठुर टीकाकार आपलीं शस्त्रें पाजळून बसलेच आहेत!' यांत वर्णन केलेली स्थिति आपणांमध्यें अजून बऱ्याच अंशांनीं कायम आहे हें दिलगिरीनें कबूल केलें पाहिजे. या स्थितीस कारण आपलें वाङ्मय अजून बरेंच बाल्यावस्थेंत असल्यामुळें नवीन निर्माण होणारीं पुस्तकें अपूर्णावस्थेंत आढळून येतात हें असावें. पण त्याबरोबरच टीका ह्मणजे दोषप्रकटीकरण ही जी आह्मांमध्यें समजूत रूढ झाली आहे, तीही अंशतः तिच्या मुळाशीं आहे. रंगणवाला ज्याप्रमाणें एखादें बोजड अस्वल रंगणांत नाचवून प्रेक्षकांना क्षणभर रिझवितो, त्याप्रमाणें होतकरू लेखकानें लिहिलेल्या पुस्तकांतील दोष वाचकांपुढें मांडून त्यांना पोट दुखेपर्यंत हंसविणें हेंच अनेक टीकाकारांस आपलें कर्तव्य वाटत असतें. असें एखादें अस्वल एखादे वेळीं लहरींत आलें असतां रंगणातून तंबूंत जातां जातां रंगणवाल्यासच प्रेमालिंगन देऊन त्यासह प्रयाण करितें व याप्रमाणें तमासगिराचाच तमाशा करून दाखवितें, त्याप्रमाणें टीकाकाराचीही कधीं कधीं हास्यास्पद अवस्था होते. असो. अशा टीकाकारांच्या भावी भडिमारास भीक न घालतां मराठी भाषेची सेवा करण्याचा रा. आपटे यांचा निश्चय पाहून संतोष वाटतो. तो ते पूर्णपणें अमलांत आणितील व तो अमलांत आणितांना निर्मल भावानें केलेल्या सूचनांचाही ते योग्य तो विचार करितील अशी आशा आहे. सरते शेवटीं मराठी भाषेंत एका अपूर्व पुस्तकाची भर घातल्याबद्दल त्यांचें अभिनंदन करून व या टीकेंत चुकीनें अधिक उणा शब्द पडला असल्यास 'क्षमस्व' ह्मणून त्यांचा निरोप घेतों.






अनुक्रमणिका

## पत्र व त्यास उत्तर.

[ पत्र ]

## नाना फडनीस विरुद्ध देव.

### श्रीगजानन.

रा. रा. विविधज्ञानविस्तारकर्ते यांस—

सा. न. वि. वि. गेल्या दोन अंकांत वे. शा. सं. खरे शास्त्री यांनीं केलेल्या 'अधिकार-योगाचे' परीक्षणाच्या नांवावर अथवा नांवाखालीं, रा. बा. ना. देव यांनीं नानाच्या राजनीतीचा आढावा काढून त्यांस मुत्सद्दीवर्गांतून खालीं ढकलण्याचा प्रयत्न केला आहे. रा. देव हे सत्यप्रिय व स्पष्टवक्ते आहेत. यांस ऐतिहासिक अभ्यासाचा चांगला नाद आहे. तसेंच रा. देव हे प्रागतिक पक्षाचे अनुयायी आहेत. या सर्व गुणांस रा. देव यांनीं आश्रय दिला असल्यामुळें त्यांचे लेख मान्य नसले तरी नेहमीं मनन करण्यासारखे असतात.

(२) पण प्रस्तुतचें त्यांचे परीक्षणाचा नेम लक्ष्य सोडून भलतीकडे गेला आहे. 'नानांस अधिकार मिळाला कसा ?' किंवा 'त्यांनीं तो मिळविला कसा ?' याचें विवेचन कागदपत्रांचे पुरावे घेऊन रा. खरे शास्त्री यांनीं केलें आहे. 'अधिकार मिळाल्यावर त्याचा उपयोग नानांनीं कसा केला ?' हा विषय रा. खरे शास्त्रीबोवांच्या उत्तरार्धांत येणार आहे. तो आल्यावर मग रा. रा. देव यांस काय सूक्तासूक्त ह्मणावयाचें होतें किंवा आहे अथवा असेल, तें ह्मणण्यास त्यांस पूर्ण स्वातंत्र्य आहेच आहे. मग रा. देव यांनीं अशी घाई कां केली ? असो. ही घाई कदाचित् रा. खरे शास्त्र्यांस उपयोगीच पडेल. पण घाई नसेल व 'अधिकार मिळवित असतांनाच, 'नानांचें राजकीय धोरण अनीतिमूलक, विग्राहक, स्वार्थसाधु, तात्पुर्तें, लटपटीचें, पोकळ वेदांताचें, प्रतिगामी व राज्यभक्षक होतें' असें रा. देव यांस वाटत होतें असेल तर प्रस्तुत कालीं त्यांचा **नानांविषयीं जो प्रतिकूल ग्रह झाला आहे,** त्याचें समर्थन त्यांनीं उदाहरणें देऊन केलें असतें तर या 'परीक्षणाच्या' प्रतिपरीक्षणास अवसर सांपडला असता. ह्मणून रा. देव यांस माझी अशी नम्र विनंती आहे कीं, श्रीमंत नारायणरावांच्या खुनापासून तों श्री. सवाईमाधवरावांच्या मुंजीपर्यंत राज्यावर, श्रीमंतांवर, नानांवर व नानांच्या स्नेह्यांवर जीं संकटें आलीं व शिंदेहोळकरांसारख्या फौजबंद सरदारांशीं, घरबुडव्या राघोबाशीं व त्याच्या अनुचरांशीं, सावकारी इंग्लिशांशीं, दुटप्पी बापूंशीं, व बाहुलेवजा मोरोबादादांशीं वागतांना त्यांनीं ज्या नीतीचा अवलंब केला, तीं संकटें कोणत्या धोरणानें निवारलीं गेलीं असतीं व ती नीति कोणत्या धोरणाच्या आश्रयानें चालविली पाहिजे होती, याची सोदाहरण व सोपपत्तिक मीमांसा टीकाविषयक पुस्तकांतील प्रसंग घेऊन करावी, ह्मणजे नानांच्या वतीनें बोलणारांस या मीमांसेचें परिक्षण करण्यास ठीक पडेल. रा. देव माझ्या या नम्र विनंतीस मान देवोत.

**चिंतामण गंगाधर भानु**

पुणें ता. ७ सप्टेंबर १९०७.

[ उत्तर. ]

A life of action, if it is to be useful, must be a life of compromise.





अनुक्रमणिका

But speculation admits of no compromise. A public man is often under the necessity of consenting to measures which he dislikes, lest he should endanger the success of measures, which he thinks of vital importance. But the historian lies under no such necessity. On the contrary, it is one of his most sacred duties to point out clearly the errors of those whose general conduct be admires.

*Macaulay.*

माझा नाना फडणिसाविषयींचा लेख प्रो. भानूंस फार विपरीत वाटला याबद्दल खरोखर मला फार वाईट वाटतें. ही गोष्ट मला अत्यंत अनिष्ट आहे, पण ती अनपेक्षित मात्र नाहीं. कारण, प्रोफेसरसाहेबांच्या ऐतिहासिक लेखांत नानाविषयीं त्यांचा प्रेमभाव फार उत्कट दिसतो. "प्रेमविषय कसाही असला तरी प्रेमकर्त्याविषयीं आदर ठेवणें विहित होय" हें लार्ड मॉर्लेसाहेबांचें वचन मला वंद्य वाटतें. शिवाय, या बाबतींत प्रोफेसरसाहेबांशीं माझी पूर्ण सहानुभूति आहे. तेव्हां त्यांच्या प्रश्नास मी शिष्यभावानें ( जरी त्यांच्या चरणीं ज्ञानामृतपान करण्याचा सुयोग मला प्रत्यक्षतः आला नाहीं, तरी त्यांच्या लेखांच्या द्वारें तें कार्य घडलें आहे ) पुढील जबाब देण्याची मुभा घेतों. त्यांत कांहीं गैर असल्यास माझें ह्मणणें मी मागें घेण्यास तयार आहें.

( २ ) गुरुवर्यांच्या दुसऱ्या कलमांतील प्रश्नाचें उत्तर माझ्या मूळ लेखांतील तिसऱ्या कलमांत आलें आहे, असें माझ्या अल्पमतीस वाटतें. सदर कलमांत "त्यांत ( अधिकारयोगांत) आलेलीं मतें मला मान्य आहेत. त्याबद्दल मुळींच वाद नाहीं" हें वाक्य आहे (पान. २१९ रकाना २ रा., वि. ज्ञा. वि.). प्रोफेसरसाहेबांस वाटतें त्याप्रमाणें माझा "नानाविषयीं प्रतिकूळ ग्रह झाला" नाहीं याबद्दल पुराव्यादाखल माझ्या टीकाविषयक लेखांतील १४ वें कलम त्यांच्या सेवेशीं पेष करण्याची परवानगी मागतों. त्यावर गौर व्हावा ही विज्ञप्ति आहे. माझें विवरण प्रारंभींच्या इंग्रजी अवतरणांत दिलेल्या इंग्रजी उताऱ्यांत निर्दिष्ट केलेल्या ऐतिहासिक सूत्रास अनुरूप केलेलें आहे. नानाच्या मुत्सद्दीपणावर अधिकारानें अभिप्राय देण्याची पात्रता गुरुमहाराजांसारख्यांची आहे. त्यास मी योग्य नाहीं हें मीं माझ्या लेखांत स्पष्ट कबूल केलें आहे, असें माझ्या सदर लेखांतील तिसऱ्या कलमाचा शेवटील भाग वाचल्यावर प्रोफेसरसाहेबांस कळेल अशी आशा आहे. ग्रांट डफ, मालकम वगैरे इंग्रजी प्रमुख इतिहासलेखक व न्या. रानडे यांच्या लेखांवरच माझ्या विवेचनाची भिस्त आहे हें मी अगोदरच सांगून ठेवलेलें होतें. पण माझ्या दुर्दैवानें तिकडे गुरुवर्यांचें लक्ष न गेल्यानें त्यांचा माझ्या मताबद्दल गैरसमज झाला आहे, असें त्यांच्या प्रश्नावरून दिसतें. सबब त्यांस इतकेंच सुचवितों कीं, माझ्या परीक्षणाचा रोख नानाच्या स. १७७३ ते १७७९ अगर १७८३ पर्यंतच्या कार्यभागाकडे मुख्यतः मुळींच नाहीं. तो मराठी राज्यसंस्थेच्या रचनाविषयक गुणदोषदर्शनाकडेसच प्राधान्येंकरून आहे. ही संस्था वरील कालावधींत नवी बनली होती, असें "अधिकारयोगांत" अगर अवांतर इतिहासग्रंथांत ह्मटलेलें नाहीं. सबब माझें विवेचन सदर कृतीस ( अधिकारयोग ) लागू पडतें असें मला वाटतें. "नानास अधिकार मिळाला कसा, किंवा त्यांनीं तो मिळविला कसा ?" अगर "अधिकार मिळाल्यावर त्याचा उपयोग नानांनीं कसा केला ?" हे प्रश्न माझ्या विवरणासंबंधानें गौण होत. हंगामी राजनीतीशीं (make-shift policy) त्या प्रश्नांचा संबंध आहे, आणि या दृष्टीनें





अनुक्रमणिका

नानाचा कारभार इतिहासांतरीं मान्य झाला आहे. पण त्यास त्याहून वरिष्ठ प्रतीचें वळण नव्हतें, तें केव्हांही मिळालें नाहीं; उलट त्यांत विग्राहक–अगर आमच्या गुरुवर्यांच्याच सर्वोत्कृष्ट शब्दांत सांगणें झाल्यास–"विकर्षात्मक" ( centrifugal ) तत्त्वें प्रबळ होत गेलीं, थोरल्या माधवराव पेशव्याच्या वेळचें मांडलिकी संग्राहक वळण बिघडत गेलें, भौतिक व नैतिक बंधाचा समतोलपणा व प्रमाण हीं अगदींच घसरलीं. या कारकीर्दींत फौजखर्चाचा पुरवठा करण्यांत नानाची हातोटी जशी " अधिकारयोगां" त दिली आहे तशी ती पुढें प्रगटली नाहीं. खरे शास्त्रीबोवांनीं महादाजी शिंद्याच्या गुरुस्थानीं बसविलेल्या मल्हारजी होळकरावर देखील या पेशव्याचा नैतिक दाब शेवटीं बसून तो (होळकर ) बराच रस्त्यावर येत चालला होता, याचा दाखला शास्त्रीबोवांच्याच इतिहासलेखांत आहे. पण तसा प्रकार पाटिलबोवांच्या संबंधानें नानाच्या हातून घडूं शकला नाहीं; राघोबा, सखाराम बापू वगैरेंचा बंदोबस्त माधवरावानें जसा केला तसा नानाच्या करवीं घडला नाहीं. इतकी ही मध्यवर्ती सत्ता पराधीन व निःसत्त्व नानाच्या अमलांत बनली ! फौजखर्चाच्या पायीं माधवरावाचें सैन्यबळ क्षीण झालें नाहीं. उलट त्याच्या कर्जाचा भार स्वशिरीं घेण्याजोगी नानाची पत व सामर्थ्य त्या वेळीं देखील प्रगटलें. तेंच पुढें पाहावें तों याच्या उलट प्रकार दिसतो ! तात्पर्य, यासंबंधीं ज्यास्त विवेचन. चर्वितचर्वणासारखें होय. "क्षीणेष्वनर्था बहुलीभवन्ति" यांत सर्व कांहीं आलें ! शास्त्रीबोवांच्या अधिकारयोगांत पूर्वोक्त तात्पुरत्या राजनीतीचें स्वरूप टिकाऊ, प्रागतिक व वरिष्ठ प्रतीचें अशा तऱ्हेचें दिसतें. पण हा आभास होय. मराठी राज्यसंस्थेंतल्या न्यूनता ना. रानड्यांच्या शब्दांतच मीं दिल्या आहेत. त्याचें स्पष्टीकरण मात्र मीं माझ्या शब्दांत यथामति केलें आहे. त्यांत कांहीं गैर असल्यास तें मी कबूल करण्यास तयार आहें. प्रो. भानूंस इतकीच प्रार्थना आहे कीं, त्यांनीं वरील दोषांचें,–ते खोटे असल्यास,–निराकरण करून नानांच्या कारकीर्दींत संकर्ष व विकर्ष ( centripetence and centrifugence यांस हे प्रोफेसरसाहेबांचे सर्वोत्तम शब्द होत ) यांच्या व्यापारांचा जोर वाढला, घटला, अगर पूर्वींसारखा राहिला, याचा निकाल अधिकारयुक्त वाणीनें द्यावा. नानाच्या मुत्सद्दीपणाची थोरवी सर्वमान्य आहे. राज्यरक्षक दृष्टीनें तर ती फार मोठी आहे. पण दृढीकरण व विकास यांच्यावांचून त्याची पतनक्षमता अपरिहार्य होय. सदर अमलाची ही दिशा अगदींच सुटली असें त्यांतील अधोगतीनें उघड होतें. नानाच्या अमलांतलें अपेशाचें खापर तत्कालीन विरोधी मंत्रिमंडळ फाजबंद सरदार वगैरे पुरुषांच्या व अधम कालगत परिस्थितीच्या माथीं फोडण्यांत कार्यकारणभावाचा विपर्यास होतो याचें स्पष्टीकरण मीं माझ्या मूळ लेखाच्या ११ व्या कमलांत केलें आहे. त्यांत कांहीं तथ्य आहे असें आमच्या पूज्य गुरुवर्यांस वाटतें काय?

( ३) आमचे प्रोफेसरसाहेब आपल्या "श्री. नानासाहेब पेशवे" यांच्या चरित्राच्या परीक्षणांत ह्मणतात "ज्या गोष्टीला कै. रानडे बिनमुत्सद्देगिरीची असें ह्मणणार तीच गोष्ट 'चांगली निदान प्रसंगोपात्त' असें मी समर्थन करणार आहें." यांतील "प्रसंगोपात्त" हा शब्द मोठा लवचीक आहे. मारुतीच्या शेपटासारखा त्याचा अंतपार लागण्याची आशा नाहीं. त्याच्या छत्राखालीं वाटेल त्यास आश्रय घेतां येतो. व अनेक प्रभावसंपन्न पण स्वार्थी व दुष्कर्मी



सत्ताधारी राजपुरुषांनीं व त्यांच्या बगलबच्चा व आगींत तेल ओतणाऱ्या त्यांच्या अनुयायांनीं अगर त्यांच्या पक्षपात्यांनीं तसें केल्याचा इतिहासांतरीं उल्लेख सांपडतो. "आह्मीं या राजकीय ज्वालाकल्लोळांत जाणून बुजून मुद्दाम पण अत्यंत सद्बुद्धीनें व सार्वजनिक हितास्तव तेल ओतण्याचें काम केलें, कारण एकदां सगळा दाह झाला ह्मणजे मग त्याच्या मागें सर्व शांत होईल; मग ही राजकारणी जमीन ज्यास्त कसदार व सुपीक बनून सर्वत्र सुबत्ता व आबादानीही झालीच पाहिजे! कारण, असा भडका नेहमीं टिकणें शक्य नाहीं." हा या अशा समर्थनाचा मथितार्थ होय. इंग्लंडच्या दुसऱ्या जेम्स राजाचा कुबुद्धि मंत्री संडलँड याच्या दुष्कर्मांचे समर्थनकर्त्यांनीं तसें केल्याचा उल्लेख इतिहासांत सांपडतो. धार संस्थानचा धाडेती कारभारी बापू रघुनाथा यानें स. १८१८ त मालकम साहेबापाशीं हाच कोटिक्रम लढविला होता, तो साहेब मजकुरांच्या "मध्यहिंदुस्थानाच्या इतिहासांत" दिला आहे. हाच प्रकार शेवटच्या राज्यबुडव्या पेशव्याच्या चांडाळ चौकडीच्या पक्षपात्यांनीं केला तर त्यांत कांहीं गैर होईल काय? मग आमच्या गुरुमहाराजांचा राघोबा अगर त्याचे चिरंजीव यांवरच एवढा रोष कां असावा हें कळत नाहीं. तेव्हां या "प्रसंगोपात्त" शब्दाच्या इतिहासशास्त्रोक्त मर्यादा आमच्या प्रोफेसरसाहेबांनीं मुक्रर केल्यास मोठा उपकार होईल. मराठ्यांचा इतिहास हा त्यांचा आवडता विषय आहे. त्यावर त्यांचा व्यासंग जबर आहे. त्यांत ते विशेषज्ञ (Specialist) आहेत असें ह्मटल्यास त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. सबब शिष्यभावानें त्यांस ही प्रार्थना करण्याची परवानगी मागतों.

**बा. ना. देव.**

## सुभाषितरत्नमाला.

### सामान्यनीति.

**अनुष्टुप**

बोलाविल्याविना जाई,
बोले पुसलियाविना,
प्रीतिपात्र नृपाचें मी
ह्मणे, तो मूर्ख जाणिजे.

**गीति.**

स्थापायास शिलेतें शैल–शिरीं[1] लागती महायास[2],
पाडाया न क्षणहि; गुणि दोषी तेविं * पुरुष व्हायास.
संसारविषतरूचीं दोन फळें अमृत–तुल्य हीं सत्य,–
काव्यरसास्वाद तसें संभाषण सज्जनांसवें नित्य.
जें शक्य ग्रासाया, ग्रस्तहि जें शक्य होय जिरवाया,
जीर्णहि[3] शक्य हिता जें, शुभेच्छुनें[4] उचित तें अनुष्ठाया[5].

१ पर्वताच्या शिखरावर. २ मोठे प्रयत्न. * पुरुष गुणि (गुणवान्) व्हायास महायास; दोषी व्हायास क्षणही न (लागे) असा अर्थ. ३ जिरलेलें. ४ कल्याण इच्छिणारानें. ५ करावयास.

इच्छावें न परधना सौहार्दें[1] प्राणिमात्र निववावे;
कर्म न विफल ह्मणावें या त्रितयातें[2] मनांत वसवावें.

काकाला दंत किती? गर्दभदेहीं कितीक केश तसे?
मेषांडीं मांस किती? इत्यादि विचारणा वृथाच असे.
प्रज्ञा स्वयें नसे ज्या शास्त्र तयालागिं काय करणार?
स्वकरीं दर्पण धरिलें जन्मांधा ह्मणुनि काय दिसणार?
दातृत्व, प्रियभाषण, समयोचित बुद्धि, थोर धारिष्ट,
अभ्यासें नच येती; स्वाभाविक चार हे गुण श्रेष्ठ.
घर्षण, छेदन, ताडन, तापन यांहीं सुवर्ण पारखिती;
तैशी पुरुषपरीक्षा विद्या, कुल, शील, कृति इहीं करिती.
बधिरासि जशी विणा, जन्मांधाला सुलोचना जेवीं,
कीं प्रेता सुममाला, विद्या स्तब्धास[3] निष्फला तेवीं.
मधुर असो, कटुहि असो, समया अनुरूप तेंचि वच रमवी
वामस्थ गर्दभरव प्रस्थानीं सुखन काय अनुपम वी?

१ स्नेहानें. २ त्रितय ह्म० तीन. ३ कांहीं एक प्रयत्न न करणारास.






अनुक्रमणिका